


नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)





महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्वारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

चित्रकार दीनानाथ दलाल ह्यांनी सन १९४७ ते १९७१ दरम्यान प्रसिद्ध केलेल्या दीपावली ह्या नियतकालिकाच्या अंकांचे संगणकीय स्वरूपात जतन करण्याबाबतचा प्रस्ताव चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई ह्या संस्थेद्वारे राज्य मराठी विकास संस्थेस प्राप्त झाला होता. सदर प्रस्तावानुसार दुर्मिळ मराठी ग्रंथांचे संगणकीकरण ह्या प्रकल्पांतर्गत दीपावली नियतकालिकांचे अंक संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासंदर्भात राज्य मराठी विकास संस्थेद्वारे सहमती दर्शविण्यात आली.

चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई ह्या संस्थेद्वारे सदर अंक संगणकीकरणासाठी उपलब्ध करून देण्यात आले. सदर संस्थेच्या सहकार्यामुळेच आपल्याला ही सामग्री संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहे.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर/ संस्थांवर असणार नाही.

सदर अंक केवळ अभ्यासकांच्या सोयीसाठी संगणकीय स्वरूपात उपलब्ध करण्यात येत असून अंकांतील सामग्रीचे (लेखन, मांडणी, छायाचित्रे, रेखाचित्रे इ.) प्रतिमुद्राधिकार त्या त्या लेखकांकडे अथवा प्रकाशकांनी त्या त्या वेळी केलेल्या व्यवस्थेनुसार आहेत ह्याची नोंद घेण्यात यावी. त्या सामग्रीसंदर्भातील कोणतेही अधिकार वा दायित्वे राज्य मराठी विकास संस्था, मराठी भाषा विभाग किंवा महाराष्ट्र शासन ह्यांच्याकडे असणार नाहीत.

अनुक्रमणिका








महाराष्ट्रराज्य वर्धापन-दिन

# दीपावली

विशेषांक

मे, १९६२

वर्ष १८ वें

मूल्य १ रुपया

अनुक्रमणिका

[अनुक्रमणिका](#)











सा हि त्य
क ला
सं स्कृ ति

महाराष्ट्र राज्य वर्धापन
दिन विशेषांक
वर्ष १८ वें
मे १९६२
टेलिफोन
७७७६५



श्रेयनामावलि—

● **यशवंतराव चव्हाण** – मुलाखत – **(सदानंद चेंदवणकर)** ● **पां. वा. गाडगीळ** – महाराष्ट्र राज्याच्या दुसऱ्या वर्धापन दिनाच्या निमित्तानें ● **शामराव ओक** – सोनेरी सहा वर्षे ● **दत्ता कदम** – श्रीमंत योगी ● **कवि यशवंत** – तो महाराष्ट्र हा प्यारा ● **श्रीपाद काळे** – एका लग्नाची गोष्ट ● **बा. भ. बोरकर** – वरदात्री पयस्विनी ● **हरिहर उसेंकर** – ऋग्वेदांतील सोम ● **जुन्यातलें सोनें** – पोपटाची साक्ष ● **शर्विलक** – पाठलाग ● **डॉ. सरोजिनी बाबर** – कल्पतरु खालीं बैसलों जाण ● **आनंद घर्टी** – कैदमें है बुलबुल ● **आत्माराम नीळकंठ** – आमचा एकांत पाहूं नवे ● **आनंद साधले** – कवि भारती ● **गोपालकृष्ण भोबे** – प्रवास माझ्या गोमंतकाचा ● **सारस्वत**

**दलाल आर्ट स्टुडिओ, ४२ केनेडी ब्रीज, मुंबई ४**

* संपादक-मुद्रक-प्रकाशक श्री. **दीनानाथ दलाल.** दलाल आर्ट स्टुडिओ ४०–४२ केनेडी ब्रिज, मुंबई ४ * या प्रतीस किंमत रु. १/२५न.पैसे अधिक रजिस्टर पोष्ट ५०न.पैसे. वार्षिक वर्गणी दिवाळी अंकासह रु. १२॥. * या अंकांत प्रसिद्ध झालेलीं मतें हीं चालकांची अधिकृत मतें असतातच असें नाहीं. 






## भारवी :

# कविता कामिनींचें तेज

प्रभातेच्या मंगल वेळीं प्रातःसंध्या करावयास सरोवरावर आलेला हा ब्राह्मण एकाएकीं संध्या करावयाचें विसरून गेलेला आहे. त्याला काव्य स्फुरत आहे. हें पहा पुढ्यांतील कमलाच्या पानावरच तो स्फुरलेलें काव्य नखानें लिहीत आहे.

**सहसा विदधीत न क्रियाम् अविवेकः परमापदाम् पदम् ॥**

स्फुरलें तेवढें काव्य कमलपत्रावर लिहून कवि आपल्या मार्गानें निघून गेला. तें कमलपत्र योगायोगानें राजाच्या हातीं पडलें आणि त्यानें तें गंमत म्हणून आपल्या शय्येसमोर टांगून ठेविलें. त्यारात्रीं राजा शयनमंदिरांत आला असतां राणीच्या कुशींत एक तरुण पुरुष झोपलेला त्याला दिसला. दोघांचाहि शिरच्छेद करण्यासाठीं त्यानें तलवार उपसली तों हें कमलपत्र त्याला दिसलें. त्यावर लिहिलें होतें "अविचारानें कोणतीही गोष्ट करूं नये." तेव्हां राजानें आपली तलवार म्यान करून राणीला उठविलें. त्यावर त्याला कळलें कीं तिच्या कुशींत त्याचाच वीस वर्षें हरवलेला मुलगा झोपला होता.

कमलपत्रावरील काव्यानें घोर अनर्थ टाळल्यामुळें राजानें त्या काव्याच्या कर्त्यास शोधून काढलें व त्याची मानानें आणि धनानें पूजा केली. हा कवि म्हणजेच भारवी. किरातार्जुनीय या विख्यात काव्याचा कर्ता. संस्कृत कवींच्या परंपरेप्रमाणें याच्याहि स्थलकालाचें ज्ञान आपणास नाहीं. पण हा महाराष्ट्रीय कवि सहाव्या शतकांत झाला असावा. हा दंडीचा पणजा असून नाशिकजवळ एलीचपूर येथें रहात असावा.

याची विश्वसनीय माहिती मिळत नसली तरी त्याच्या काव्याचा आस्वाद घ्यावयास त्यामुळें मुळींच अडचण पडत नाहीं. ज्या सूर्याचें





अनुक्रमणिका

तेज आपण पाहतों त्याची प्रचीती येण्यासाठीं आपणास सूर्याच्या इतिहास भूगोलाची काळजी करावी लागत नाहीं. भारवीचें असेंच आहे. भारवी हा कविता मानिनीचें मूर्तिमंत तेज आहे. ज्वलंत अग्नि-शिखेप्रमाणें त्याची दीप्ति आहे.

हें तेज भारवीला तपाशिवाय लाभलें नसणार. तहान भूक विसरून उदात्त विचाराच्या चिंतनांत हाडांची काडें करावीं तेव्हां कुठें अशा तेजाची साधना होते. शिळेवर तर शिळेवर झोपावयाचें. पाला तर पाला खावयाचा. ऊन तर ऊन. थंडी तर थंडी. एक चिंतनाचा तेवढा ध्यास. त्याचीच एक आंच लागलेली. भारवीनें ज्या आंचेनें तप केलें ती आंच वैभवाची नव्हती. कांचेची नव्हती. शृंगाराची तर नव्हतीच नव्हती. ती आंच देदिप्यमान पौरुषाची होती. तेजाची होती. आंचेने केलेल्या या तपाला तेजाचें फळ मिळालें. अंगोपांगीं तेज फांकलें. वाणी तेजाळ झाली. सागराच्या अथांग गांभिर्यास लाजविणारें अर्थगांभिर्य इवल्या इवल्या शब्दांत साकार झालें. आणि भारवीचें काव्य उदयास आलें. किरातार्जुनीयांत या तेजाचा आविष्कार जागोजाग झालेला आहे.

मोक्षवृत्तीच्या आड आपला भेकडपणा लपविणाऱ्या नादानांना अक्षरशः लाथ मारण्यासाठीं भारवीनें हें काव्य लिहिलें आहे. कांतेवर अत्याचार झाला. तरीहि तो शांत बसून पहाणाऱ्या युधिष्ठिर धर्मास प्रणामपूर्वक धिक्कारून, अर्जुनानें कौरवांचा निःपात करण्यासाठीं तप-पूर्वक बल संपादन केलें हा या काव्याचा विषय आहे. सामाजिक आणि राष्ट्रीय जीवन पौरुषशून्यतेनें जगणाऱ्या नेभळ्या लोकांना हें काव्य म्हणजे महामृत्युंजय मात्रा आहे. अस्थानीं निवृत्तीनें लोळागोळा झालेल्या समाजांत नवचैतन्य आणण्यासाठीं भारवीनें हें दिव्य अंजन निर्मिलें आहे.

या तेजाचा आविष्कार सहस्र धारांनीं होतो. अग्निज्वालेप्रमाणें तळपणारी तेजस्विनी द्रौपदी या तेजाचें मूलपीठ आहे. ती याज्ञसेनी धर्माच्या शांतीचा धिक्कार करून त्यास म्हणते, "जळो तुमचा मनः-संयम आणि आग लागो तुमच्या पौरुषाला. तुमच्या संतोषाचा धिक्कार असो." द्रौपदीचें भाषण पाषाणांतहि शौर्याचे घुमारे आणणारें आहे. भीम धर्मास म्हणतो "उत्कर्ष हा पौरुषाच्या आश्रयानें राहातो; रडतराव-पणाच्या आश्रयानें नव्हे." द्रौपदी आणि भीम दोघे अपमानानें जळून धर्माची निर्भत्सना वारंवार करीत असतातच; पण भारवीचा तपोबल व्यासहि धर्मास म्हणतो "साम्राज्य सद्गुणांनीं मिळत नाहीं तर पौरुषानेंच मिळतें!"

धर्माचे सारे शांतिपाठ धिक्कारून अर्जुन पौरुषाची कास धरतो. भारवीनें पौरुषाचा गौरव इतका दाखविला आहे, कीं मूळ भारतांतील अर्जुन किरातरूपी शंकराला शरण जाऊन त्याला प्रसन्न करून घेतो; तर भारवीचा अर्जुन शंकराला भूमीवर आपटण्यासाठीं पायाला धरून उचलूं पहातो. आणि त्या बलदर्शनानें शंकर प्रसन्न होतो. शंकर-भक्तांस हें कदाचित रुचणार नाहीं. पण पौरुषाची आराधना करणा-रांनीं हा आदर्श विसरून चालावयाचें नाहीं.

महत्वाच्या कामासाठीं जातांना वाटेंत सुंदरी भेटली तर तिच्या सहवासांत एखादा क्षण मोडावयास हरकत नाहीं हें कालिदासाचें मत भारवीला मान्य नाहीं. त्यामुळें अर्जुन हा ज्ञातास्वाद असूनहि समोर येणाऱ्या विवृतजघना अप्सरांकडे बिलकूल लक्ष देत नाहीं.

याचा अर्थ भारवीला शृंगार अपरिचित होता असें मुळींच नव्हे. पण शृंगार हा जीवनाचा स्थायीभाव नसून तो केवळ जीव-नाला रुची आणण्यासाठीं मिठाप्रमाणें वापरावयाचा. तेजाळ पराक्रम हाच जीवनाचा स्थायीभाव. हा लवणाएवढा शृंगार किती रुचिर होतो हें काय सांगावें! आपल्याच सुखासाठीं अर्जुन दूर जावयास निघाला तेव्हां द्रौपदीस शोक आवरेना. नेत्र अश्रूंनी ओलावून दंवस्नात कमलाप्रमाणें दिसूं लागले. अर्जुनाकडे तिला एक प्रेमपूर्ण कटाक्ष टाकावयाचा होता. पण दुष्ट अश्रूंनी पटल निर्माण केल्यामुळें तिला तसें करतां येईना. बरें. अश्रु गाळून दृष्टि मोकळी करावी तर मंगलप्रसंगीं रडणें अनुचित. म्हणून तिचा मोठा कोंडमारा झाला. एवढाच शृंगार. पण काय त्याची माधुरी. कालिदासानें वर्णिलेला शृंगार वाचून मनाला कितीहि आनंदाच्या उकळ्या फुटल्या तरी भारवीचा हा शृंगार वाचून मन ज्या पातळीवर जातें ती पातळी कालिदास गाठूं शकत नाहीं.

भारवीचें काव्य वाचलें कीं त्याची मूर्ति समोर साकार होते. देह तपाचरणानें सुकून गेला आहे. दाढी जटा वाढलेल्या आहेत. थंड पाण्याच्या आंघोळीनें त्वचा सुरकुतली आहे. धुळीचें पुट अंगावर चढलें आहे. कसलें तरी वस्त्र कसेंतरी लज्जारक्षण करात आहे. स्वारी आपल्याच चिंतनांत कुठेंतरी चाललेली आहे. आणि ते डोळे!

—त्यांत सारी जीवननिष्ठा प्रखर तेजोरूपानें सळसळत आहे. जणूं रवीची भा त्याच्या नेत्रांतून जगाला भारून टाकत आहे, म्हणून तो भारवी.

फक्त एकच वाईट वाटतें. विश्वाचें स्वरूप पालटून टाकण्याचें सामर्थ्य एका अणूंत असतें. पण तें कष्टसाध्य असत. शब्दाशब्दात भरलेलें भारवीचे अर्थगांभिर्य तसेंच कष्टसाध्य झालेलं आह. द्राक्षाच्या रसाप्रमाणें तें चटकन जिभेवर ओघळत नाहीं. तर नारळाप्रमाणें सोलून, फोडून किसून काढावें लागतें. त्यामुळें भारवीच्या कवितेला मल्लीनाथ, नारीकेलपाक म्हणतो.

'प्रासकर्मापुढें मला मोक्षाची फिकीर नाहीं. कर्मभोग हाच माझा मोक्ष आहे.' असें ठणकावून सांगणारा अर्जुन त्यामुळें आपणाला एकवारहि स्मरत नाहीं. पण "ज्याअर्थीं ही स्त्री मला हवीशी वाटते त्याअर्थीं ती मला मिळावयास अडचण नसावी" असें म्हणणारा दुष्यंत शतवार स्मरतो.

— आनंद साधले










महात्मा गांधींचें स्वप्न साकार करणारें



# पंचायत राज्य

आणि

भारताच्या ग्रामीण विभागाचा निश्चित विकास.

**महाराष्ट्र राज्याचे माननीय मुख्यमंत्री**

## श्री. यशवंतराव चव्हाण

यांची श्री. **सदानंद चेंदवणकर** यांनी 'दीपावली'साठीं घेतलेली खास मुलाखत.

"आज भारतसरकारें देशभर पंचायत राज्याची स्थापना करण्याचा उपक्रम करीत आहे. राष्ट्राच्या कांहीं विभागांत तीं स्थापित झालीहि आहेत. महाराष्ट्रांत ही पंचायत राज्याची अंमलबजावणी येत्या १ मे १९६२ रोजीं महाराष्ट्र राज्य स्थापना उत्सव दिनी होत आहे. परंतु इतर राज्यांत म्हणजे आंध्र व राजस्थान याठिकाणीं यापूर्वीच सुरू झालेल्या या राजवटीचे महाराष्ट्र राज्य अनुकरण करीत नाही किंवा महाराष्ट्रांत केवळ एक प्रयोग म्हणूनहि पंचायत राजवट अस्तित्वांत येत नाहीं तर ती ग्रामीण जनता आणि सरकार यांच्या सहकार्यानें उच्च पातळीवर कामकाज करणारी एक प्रतिनिधिक संस्था होय" अशा आशयाचे महत्त्वपूर्ण उद्गार मुख्यमंत्री श्री. यशवंतराव चव्हाण यांनी पंचायत राज्यासंबंधीची मुलाखत देतांना 'सह्याद्री' वर मजसमोर काढले.

"या पंचायत राज्याची मूळ कल्पना कोणाची?" असा प्रश्न विचारला असतां श्री. यशवंतराव म्हणाले, "पंचायत राज्याची मूळ कल्पना महात्मा गांधीजींची. बापूजी नेहमी म्हणत जर खेड्यांचा नाश झाला तर भारत हा भारत राहणार नाही. स्वतंत्र भारतांत प्रत्येक खेडें हें पूर्ण सत्ताधीश, लोकसत्ताक अगर 'पंचायत' होईल म्हणून प्रत्येक खेड्यानें स्वयंपूर्ण व स्वतःचा कारभार करण्यास समर्थ बनलें पाहिजे. गांधीजी महान्‌भविष्यद्रष्टे होते. त्यांची कल्पना बहुतांशीं मूर्तस्वरुपांत येऊं लागली आहे. सत्तेचें विकेंद्रीकरण होऊन पंचायत राज्यें भारतांत निर्माण होत आहेत ही आपल्या मतें चांगली गोष्ट आहे."

"या पंचायत राज्याच्या योजनेची पार्श्वभूमी आपण थोडक्यांत सांगू शकाल का?" असे विचारल्यावर श्री. चव्हाण पुढें म्हणाले,

"१५ ऑगस्ट १९४७ रोजी देश स्वतंत्र झाला. एक जिकीरीची समस्या सुटली. आतां स्वातंत्र्य टिकवायचें काम आलें. पारतंत्र्यामुळें जनता गांजलेली होती. पारतंत्र्यानें दारिद्र्याचा भयानक भस्मासूर निर्माण करून ठेवला होता. काम अवघड होतें. समाजाच्या अगदीं खालच्या थरापर्यंत स्वातंत्र्याची फळें सर्वांना मिळालीं म्हणजे स्वातंत्र्य टिकाऊ होते. म्हणून लोकशाही समाजरचनेचा संकल्प राज्यकर्त्यांनी सोडला. लोकशाहीत नियोजन आणि विकास यांना अग्रस्थान असतें. शिवाय दोघांमध्यें समतोलपणा असावा लागतो. विकासाशिवाय नियोजनाला अर्थच नसतो. याकरितां सरकारनें एकाच वेळेला नियोजन व विकासकार्य यांना हात घातला. पुढें दिसून आलें कीं नियोजनांत समाविष्ट केलेली धरणें, कारखाने या व अशाच मोठमोठ्या योजनांकडे सरकारचा जास्त वेळ पैसा व शक्ति यांचा वेंच झाला. विकासाच्या कामाकडे त्या मानाने लक्ष अपुरें पडलें. हें असेंच चालू राहिलें तर समाजवादी समाजरचनेचें ध्येय आटोक्यांत येणार नाही अशी तीव्र जाणीव झाली. आपला भारत हा खेड्यांचा देश आहे. देशाची उन्नति एक समयावच्छेदें करून घडवून आणावयाची तर खेड्यांना प्राधान्य दिलें पाहिजे. देश सुधारावयाचा असेल तर आधीं खेड्याकडे चला असा म. गांधींचा आवाज होता. स्वातंत्र्यानंतर जनतेच्या आकांक्षा उंचावल्या, राष्ट्राची









बांधेसूद उभारणी करणें हें आद्यकर्तव्य निश्चित झालें. त्यासाठीं ग्रामीण विभागाचा तडाखेबंद विकास झाला पाहिजे अशा धोरणाला दिशा मिळाली. 'सामूहिक विकास योजनांचा मुख्य-उद्देश ग्रामीण विभागाचा विकास' हें ब्रीदवाक्यच ठरलें. वस्तुतः सामूहिक विकास योजना ही कल्पना कांहीं नवी नाहीं. गांधींजी, टागोर इत्यादींनी हें कार्य करण्यासाठीं विधायक वृत्तीच्या सेवाभावी कार्यकर्त्यांच्या संघटना बांधल्या होत्या. त्या सर्वांचा विचार करण्यांत आला व योजना मंडळाची स्थापना होऊन पहिली पंचवार्षिक योजनाकार्यवाहित झाली. या योजनेचा उद्देश सामान्यांतील सामान्य माणसाच्या जीवनांत सुखाची लिपी लिहून आनंदाचे अंकुर निर्माण करणें हा होता. म्हणजे मूलभूत दारिद्र्य व प्राथमिक सुखसोयींचा अभाव इ. अडीअडचणीं दूर करण्याची तांतडीची गरज होती. पहिल्या पंचवार्षिक योजनेच्या टप्प्यांत किती वाटचाल झाली याचा आढावा घेऊन कार्याचे समालोचन व उपाययोजना सुचविण्यासाठीं बलवंतराय मेहता समितीची सरकारनें योजना केली. 'सामूहिक विकास योजनांचा आशय काय असावा, त्या कार्यक्रमांतील विशिष्ट विभागांना प्राधान्य कसें द्यावें ह्या कार्यक्रमाच्या संघटनेची पद्धती कोणती असावी व तो कार्यान्वित करण्यासाठीं कोणत्या कार्यक्रम पद्धतीचा अवलंब करावा, विशेषतः शेतीची पैदास वाढविण्याच्या उद्दिष्टावर विशेष लक्ष देऊन भिन्न भिन्नखात्यांत व यंत्रणांमधे एकसूत्रीपणा कसा आणावा, त्याचप्रमाणें कामाचा उरक साधण्यामधें वेग कसा निर्माण करावा, जनतेंतून स्वयंस्फूर्त सहकार्य प्राप्त करण्यासाठीं कोणकोणतीं क्षेत्रें धुंडाळावी या सर्व गोष्टींचा विचार या बलवंतराव मेहता समितीनें करावयाचा होता. तेव्हां या मेहता समितीनें आपल्यावर सोंपविलेल्या प्रत्येक बाबतीची सूक्ष्मपणें तपासणी केली, सखोल साधक बाधक चर्चा केली व सत्तेच्या विकेंद्रीकरणाची सूचना मांडली. मेहता समितीची विकेंद्रीकरणाची योजना म्हणजेच ग्रामपंचायत, पंचायत समिती व जिल्हापरिषद होय. मेहता समितीच्या अहवालाला आधारभूत मानून महाराष्ट्र राज्यसरकारनें महसूल खात्याचे मंत्री श्री. वसंतराव फुलसिंग नाईक व श्री. डी. डी. साठे, आय. सी. एस्. यांच्या नेतृत्वाखालीं एक समिती स्थापन केली. त्या समितीनें आपला अहवाल १५ मार्च १९६१ रोजीं सादर केला असून त्यानुसार एक विधेयक तयार केलें व सभागृहाच्या मान्यतेसाठीं तें नागपूरच्या अधिवेशनांत मांडण्यांत आलें नि तें साधक बाधक चर्चेनंतर संमतहि झाले व त्याची अंमलबजावणी आतां होत आहे. अशी या पंचायत राज्याच्यां योजनेची पार्श्वभूमी आहे."

"या पंचायत राज्याचा उद्देश काय ?" या मी विचारलेल्या प्रश्नावर उत्तर देतांना श्री. चव्हाण सांगतात. "पंचायत राज्य म्हणजे कायद्यानुसार लोकशाही. तत्वावर स्थापन झालेल्या संस्था होत. प्रत्येक गांव हा आपल्या लोकांच्या गरजा भागविण्याच्या दृष्टीनें आणि आपली सामाजिक, आर्थिक व सांस्कृतिक कार्य चोख रीतीनें पार पाडण्याच्या दृष्टीनें मूलघटक बनावा हाच हीं राज्यें स्थापन करण्याचा उद्देश आहे. लोकांमधें धडाडी निर्माण करणे, त्यांच्या उपक्रमशीलतेला आवाहान करणे, त्यांच्यातील नेतृत्वाचे गूण शोधून त्याची जाणीवपूर्वक जोपासना करणे या गोष्टी लोकशाहीच्या निकोरवाढीसाठीं तद्वतच अंतीम यशासाठीं नितात आवश्यक आहेत आणि हे सारें पंचायत राजवटीनें दिसून येणार आहे."

"या पंचायत राज्यापासून फायदे आणि तोटे कोणते आहेत" असें विचारलें असतां मुख्यमंत्री म्हणतात, "माझ्यामतें या पंचायत राज्यापासून तोटे असे बिलकुल नाहीतच, पण फायदे मात्र भरपूर आहेत. पहिला मोठा फायदा म्हणजे लोकशाही जनतेच्या अधिकाधिक जवळ येणार आहे. जनतेचा कागदोपत्रीं होणारा लांबलचक प्रवास पुष्कळच कमी होणार आहे. ग्रामीण जनता आपले सगळे प्रश्न एकमेकांच्या जिव्हाळ्यानें आणि समजुतीनें सोडविण्यासाठीं एकत्र बसून त्याचे निर्णय लावूं शकणार आहे. लावून घेणारहि आहे. थोडक्यांत पंचायत राज्य म्हणजे ग्रामीण जनतेचा वाटाड्या, मार्गदर्शक आहे. सत्तेच्या विकेंद्रीकरणानें खेड्याखेड्यांतून जनसौख्यात भरच पडणार आहे फार मोठ्या प्रमाणांत ग्रामीण जनतेच्या हातीं सत्ता नि सरकारी नोकरांचें सहकार्य पडणार आहे."

"आपल्या दृष्टीनें पंचायत या शब्दाचा खरा-अर्थ काय ? यापेक्षां अधिक चांगला शब्द सुचला नाहीं कीं काय ? भारतांत आणखीन कोणत्या राज्यांनी यापद्धतीचा स्वीकार केला आहे ? कोणतीं पुढें करणार आहेत ? महिलांना या पंचायत राज्यांत कांही वाव आहे का ?" या माझ्या प्रश्नांच्या भडिमाराला उत्तर देतांना मुख्यमंत्री सांगतात, "समाज-विकास कार्यक्रमांची अंमलबजावणी करणारी यंत्रणा म्हणजे पंचायती. खेड्यांतील जनतेनें आपल्या प्रयत्नांनीं व एकमेकांच्या सहकार्यानें ग्रामीण जीवनाच्या सर्व अंगात व या जनतेच्या राहाणीमानाच्या दर्जांत झपाट्यानें सुधारणा घडवून आणणे हें समाज विकास कार्यक्रमांमागील मूलभूत उद्दीष्ट आहे अर्थात् या कार्यक्रमांत सरकारहि तांत्रिक सहाय्य, मालाचा पुरवठा, कर्ज व्यवस्था इत्यादि प्रकारें मदत करीत असतेच. ग्रामीण जनतेचे हे स्वावलंबनाचे व सहकार्याचे प्रयत्न खेडें, विकासगट आणि जिल्हा येथपर्यंत पंचायतीद्वारा व सहकारी संख्याद्वारा होत असतात. अशा पहिल्या पंचायतींच्या यंत्रणेस 'पंचायती राज्य' म्हणतात."

"माझ्यामतें पंचायत हा शब्द खरोखरच चांगला आहे. पण त्यांतूनहि कुणी आणखीन चांगला शब्द सुचविला तर योग्य तो बदल करण्यास माझी कांही हरकत नाहीं. बलवंतराय मेहता समितीच्या शिफारसीनुसार आंध्र प्रदेश, आसाम, मध्य प्रदेश, मद्रास, म्हैसूर, ओरिसा, पंजाब, राजस्थान आणि उत्तर प्रदेश या राज्यांनी या पंचायत राज्यपद्धतीचा म्हणजे जिल्हा परिषद, पंचायत समिति व ग्रामपंचायत या त्रिचक्री पद्धतीचा स्वीकार केला आहे. अलिकडेच गुजरात राज्याच्या लोकशाही विकेंद्रीकरण समितीनेहि या पद्धतीची शिफारस केली आहे. या सर्व राज्यात गट व जिल्हा पातळीवरील स्थानिक संस्थांना कायद्यानें प्रस्थापित व एकजिनसी स्वरूपाचें अस्तित्व आहे. मेहता अहवालावरून विचार करण्यासाठीं बिहार सरकारनेंहि एक समिती नियुक्त केली आहे. फक्त बंगाल व केरळ या दोनच राज्यांनी याबाबत काहीहि हालचाल केल्याचें एकिवांत नाहीं. या पंचायत राज्यात महिलांना कितीतरी वाव आहे"

"पंचायतराज्याचें मतदान कसें काय केलें जाणार ? ही योजना यशस्वी करण्यासाठीं काय केलें पाहिजे ?" असे विचारतां

श्री. चव्हाण म्हणाले, "येत्या मे महिन्याच्या १ तारखेपासून महाराष्ट्रांत विकेंद्रसत्ता कायद्याचा अंमल सुरू होईल. १ मे रोजीं प्रत्येक जिल्ह्यांत मुख्य कार्यकारी अधिकारी आपल्या नोकरवर्गासह अधिकारावर रुजू होतील आणि जिल्हा परिषदांच्या अखत्यारींत येणारा राज्यकारभाराचा भाग कलेक्टरापासून तोडून घेऊन जिल्हापरिषदेच्या नांवाने कारभार करूं लागतील. त्यानंतर कलेक्टर हे आपापल्या जिल्ह्यांत परिषदांच्या व पंचायत समितीच्या निवडणुका घडवून आणतील, या निवडणुकीस कुणाहि व्यक्तिला, म्हणजे ती व्यक्ति जिवंत असली पाहिजे, वयांत आलेली असली पाहिजे, त्या क्षेत्रांतली असली पाहिजे आणि वेडी असतां कामा नये तिला निवडणूकीस उभे राहतां येईल. निवडून आलेल्या यशस्वी उमेदवारास अर्थातच योग्य ते अधिकार दिले जातील. उभे राहाण्यास कोणत्याही प्रकारची शैक्षणिक लायकी आवश्यक अशी नाहीं. ही योजना यशस्वीकरण्यासाठीं अर्थातच जनतेच्या सहकार्याची अत्यंत आवश्यकता आहे. जनतेने योग्य लायक माणसें निवडून दिलीं पाहिजेत त्यांना आवश्यक ती मदत केली पाहिजे, सेवानिष्ठ प्रामाणिक माणसांचा संच पाठविला पाहिजे."

"हें पंचायत राज्य सर्वत्रच अस्तित्वांत येणार आहे काय ?" असें विचारतां मुख्यमंत्री म्हणतात, "नाही. ज्याठिकाणीं स्थानिक म्युनिसिपालिटया नाहींत अशा ठिकाणीं या पंचायत राज्याचा अंमल राहील. मोठाल्या शहरांतून नाही."

"पंचायत राज्याची आर्थिक परिस्थिति कशी काय राहाणार आहे ?" या प्रश्नाचें उत्तर देतांना ते म्हणतात, "जमीन महसूल, सेल्स टॅक्स आणि विविध कर वसूल करण्याचे अधिकार या पंचायत राज्याला देण्यात आलेले आहेत. या वसूल केलेल्या करांतूनच पंचायत राज्य आर्थिक अडीअडचणी सोडवूं शकेल याशिवाय सरकारनें आणखीन् काहीं कोटी रुपयांची तरतूद करून ठेवली आहे."

"हें पंचायत राज्य बिल जेव्हां संमत होण्यासाठीं मांडलें गेलें तेव्हां विरोधीपक्षीयांची या बिलासंबंधी भूमिका कोणती होती ?"

अनुक्रमणिका








परीक्षा



विकासाच्या कार्यांत जनतेचें आत्मीयतेनें सहकार्य मिळालें पाहिजे आणि राज्यकारभारांत आपला प्रत्यक्ष भाग आहे असें लोकांना वाटलें पाहिजे यांत कोणाचें दुमत असूं शकत नाहीं. तेव्हां ग्रामीण जनतेवर कारभाराची जबाबदारी टाकूंच नये असें म्हणण्याचा करंटेपणा कोणीच दाखविला नाही. या योजनेच्या कांही अंगनिउपांगासंबंधी साधकबाधक चर्चा झाली खरी परंतु निराशा किंवा निरुत्साह वाटण्यासारखी परिस्थिति कांही उद्‌भवली नाहीं.''

''सत्तेचें आतां विकेंद्रीकरण झाल्याने केंद्र सरकारकडे कोणत्या बाबी राहूं शकतील ?''

''भावी भारतांत सहकारी संस्था व पंचायत राज्यांचें जाळें खेडीं, गट, जिल्हा तें राज्य व केंद्र सरकारपर्यंत पोहोंचेल आणि मग भविष्यकाळांत केंद्र सरकारकडे फक्त परराष्ट्रीय धोरण, संरक्षण व चलन या व अशासारख्या बाबीच राहूं शकतील.''

'' जिल्हापरिषदा आणि पंचायत राज्याच्या स्थापनेनंतर संबंधित मंत्र्यांचे नि त्यांच्या मंत्रालयाचे काम कमी होणार असें असूनहि नव्या मंत्रीमंडळांत मंत्र्यांची संख्या वाढली आहे असें म्हटलें जातें त्याचें काय ?''।

तेव्हां श्री. चव्हाण म्हणाले. ''सचिवालयांतील कागदपत्रांचे एका विशिष्ट चाकोरींतील काम जरी विकेंद्रीकरणामुळें कमी झालें असलें तरी संबंधित मंत्र्यांची कामाचीं नवी क्षेत्रें वाढतील. नव्याने निर्माण झालेल्या जिल्हा परिषदांना, पंचायत राज्यांना त्या त्या खात्यांच्या क्षेत्रांतून विविध योजनांची अंमलबजावणी करण्याजोगी परिस्थिति उत्पन्न करून देणे ही जबाबदारी अर्थातच मंत्र्यांचीच राहील. परिषदांना धोरणविषयक मार्गदर्शन करणें, जिल्ह्याजिल्ह्यांतील कार्यक्रमांच्या कार्यवाहींत सुसंगति, सूत्रबद्धता ठेवण्याची खटपट करणे, उद्भवलेले नवेनवे प्रश्न सोडविणें हीं कामें अर्थात्च मंत्री मंडळाला करावी लागतील.''

'' पंचायत राज्यासंबंधीं आपण आणखीन काय सांगू शकतां ?''

'' पंचायत राज्यावर सर्वांची निष्ठा पाहिजे. लोकांवरील निष्ठा हा पंचायती राज्याचा पाया आहे. जनतेच्या अत्यंत निकटवर्तीय प्रश्नासंबंधी अंमलबजावणी कशी होते, कशी नाही याची संधि आतां पहावयाला सांपडणार आहे. थोडक्यांत एका अर्थानें जिल्ह्याचे आतां वेगळे मंत्रीमंडळच बनणार आहे. तेव्हां या योजनेचें मी स्वागतच करतो आणि महाराष्ट्रांत ही योजना यशस्वी होईल अशी शुभेच्छा प्रगट करतो.''

● ● ●
















*शिवाजीराजे खालीं वांकले, मातुश्रींच्या पायांवर त्यांनी कपाळ घातलं. जिजाबाईनं त्यांना उठवून हृदयाशीं धरलं, कुरवाळलं, सभोंवतालचा मुकेपणाच बोलका झाला. आणि मातुश्रींच्या तोंडून दोनच शब्द आले 'विजयी भव–'*



— दत्ता कदम

समय अत्यंत मोलाचा होता म्हणून कोणावर विसंबून न रहातां खास जाऊन शिवाजीराजांनी गडाचा बंदोबस्त पाहिला. आज्ञेप्रमाणें कोसाकोसांवर नाकेबंदी झाली होती. बाणाच्या टप्प्यांत जमाव सावध झाले होते. नाक्यांच्या चौकशीस त्यांनी रघुनाथ बल्लाळ सबनीस यांना नेमलं होतं. त्यांच्या पाठीवर थाप मारून शिवाजी राजांनी त्यांना हुशार केलं. तेव्हां सबनीस अदबीनं म्हणाले, 'स्वराज्य धर्म स्थापनेंत बुद्धी व जयहि दिवसे-दिवस अधिकच होत असे. महाराज अफझलखान विषय तो किती ?'

मंदसं हसुन शिवाजी राजांनी सांगितलं, 'सबनीस, कोणी किती ,विषय तें आपलें मनगट बोलेल. उगा शब्दांच्या जत्रेंत अर्थ तो काय ? पटणारे कर्म नेकीनें करावे. यापरती दुजी जिगर कोणती !

शिवाजीराजांचे बोल ऐकून, आपण कुठून बोललोसं सबनीसांना झालं. नकळतच त्यांनी शिवाजी राजांना मुजरा केला. त्या मुजऱ्याचा स्विकार करून शिवाजीराजांनी नेताजी पालकरांना सांगितलं, 'सरनोबत, खालीं खान बुडवितांच तोफखाना व बुनगे दस्त करावे. घाटावरोन उपराळा येवो न द्यावा. मोठ्या झाडांची तोड करोन मार्ग अेकच असे तो बंद करावा. चढोन येतील तर तैसे करो न द्यावे'

पालकरांनी आज्ञा शिरावंद्य मानली. सगळ्यांचा उत्साह बघून शिवाजीराजांनी गौरवून बोलणं केलं, "तुम्हीं सर्व शूर आहां. आमची मदार तुम्हांवरच आहे. मोठा मस्त हत्ती, त्याचे मस्तकीचा मणी प्रयत्ने काढोन त्याजवर आरोहण करणे मनुष्याचे अनुकूलतेनें होते. राज्य वृद्धीस पावेल तसतसे, असे ते सर्व तुमचे असे."

तें अैकुन मोरोपंत पेशव्यापासून त्रिंबक भास्करापर्यंत सगळ्यांचं रक्त जागं झालं. शिवाजीराजांनी पुन्हां सांगितलं, 'आम्हीही होड आरंभिली. श्रीसिद्धीस नेईलच. कदाचित वाकडेहि पडल्या तुम्हीं घाबरे न होतां बेत केला याप्रमाणें खान व फौज गर्दी करोन बुडवावे, राज्य रक्षावे.'

शिवाजीराजांचं सांगणं प्रत्येकाच्या मनाच्या मनाला भिडलं. शिवाजीराजांच्या तोंडची कदाचित वाकडं पडण्याचीहि जाणीव झटकन डोळ्यांना आलेपणा द्यायला समर्थ ठरली. न राहवून मोरोपंत पेशवे म्हणाले, 'महाराज, आपण मनाचे शक्तिमान आहां. अैसे वाकडे होण्याचें चित्तीं आणो नये.'

चौफेर बघून शिवाजीराजांनी उत्तर केलं, 'पेशवे, कदाचित वाईट होणे असेल त्याचीहि चित्तीं उत्पत्ती असो द्यावी. आम्हीं संपलों तरी स्वराज्य राहणार असे. भावनेपोटीं विवेक ढळो न द्यावा.' शिवाजी-राजांची वाणी नगाऱ्यासारखीहि घुमली आणि वीणेच्या तारेसारखीहि झंकारली. त्यांच्या अपार व्यक्तिमत्वापुढं पेशवे नतमस्तक झाले.

नाक्याचौक्यांचा बंदोबस्त बघून महालाकडे परत येतांना एक-ठिकाणीं शिवाजीराजे थांबले. समोर वाईची दिशा दिसत होती. डाव्या हाताकडच्या सुरनिसांना ते म्हणाले, 'येथे बुरुज असणें बऱ्याचीच गोष्ट. आमच्या डोळीयांनी आजवर ही जागा कैसी सोडिली !' आणि शिवाजी-राजे त्या आवेगांत पुढं म्हणाले, 'प्रतापजी'



अनुक्रमणिका

तुमचे अंगीं-खांदीं आम्हीं पोर, समयीं सावरावें. आम्हांसी कृत्ते द्यावी.' शिवाजी-राजानीं आदरानं हात जोडले. पेशव्यांनीं विचारलं, 'महाराज, नमस्कार कुणासी केला?' तेव्हां राजे म्हणाले, 'आमच्या वडिलांच्या ठायीं आज प्रतापगड असे. त्यांसी हात जोडले.' सगळ्यांना वाटलं राजांचं वागणं ते राजाचंच तें कुणाला जमणार नाहीं.

शिवाजीराजे महालावर आले. वकिलाच्या मार्फत ठरल्याप्रमाणें गडाखालीं खानाच्या भेटीला जायची त्यांनीं तयारी चालविली. त्यांनीं सेवकाला टाळी वाजवली तर खुद्द जिजाबाई वस्त्रें घेऊन पुढं आली. शिवाजी राजांनीं विचारलं, 'मा-साहेब, आपण ऐसी तसदी कां घेतां?'

जिजाबाई म्हणाली, 'सगळे आहेती तरी हा समय सेवकांनीं वस्त्रें देण्याचा नसे. श्रीभवानी पाठीशी असल्यावर भय कोणाचें? आपल्या वडील भावाला दग्यांनी मारविलें याचा सूड घ्यावा. शिपाईगिरीची शर्त करोन माझे डोळियांचे पारणें फेडावे. तूं जे मनीं धरितोस तें देव सिद्धिस नेतो. कुलदीपक आमचें पोटीं निर्माण जाहला आहेस. वीर पुत्राचीं माता होण्याऐसा दुजा मोक्ष नसे.'

जिजाबाईच्या शब्दांनीं शिवाजी राजांचं मन भरून आलं. पण त्यांनीं कढ गिळला. ती पुढं झाली आणि तिनं अल्मारींतून जिरेटोप काढला, बिचवा काढला, वाघनखें काढली. प्रत्यक्ष जन्म देणारी आई पाषाणाचं मन करून, मृत्यूशी झुंज देण्यासाठीं मुलाची पाठवणी करूं लागली. मातुश्रीच्या अलौकिक तेजानं शिवाजीराजे दिपून गेले.

'मा-साहेब, हा सगळा जामानिमा करावयाचा कीं काय?' शिवाजीराजांनीं अलमारींतून काढलेल्या साहित्याकडं बघून विचारलं,

'म्हणजे तुजा काय विचार?'

'खान तर नेसल्या वस्त्रानिशीं सदरेला येणार असे.'

'इतुकेच नां? पण त्याचे दगाकपट मनांत आणावे. सदरेला सावध जावे. मी कितीहि पाषाणाचे मन केलें तरी माया तुटत नसे.'

लगेच शिवाजीराजांनीं चिलखत घातलें, जिरेटोप चढवला, झगा घातला, पागोटें घातलें. चोळणाकाचा घालून ढाल पाठीशीं लाविली. बिचवा घेतला, वाघनखें घेतलीं, वंदन करून भवानी तलवारीला स्पर्श केला. तें एवढें अपूर्व उग्ररुप झालं कीं, प्रत्यक्ष भवानी संचारल्यागत वातावरण भरलं गेलं. शिवाजी राजांच्या कानशिलांवर बोटं मोडून स्वतःच्या गळ्यांतला कंठा जिजाबाईनं झटकन् त्यांच्या गळ्यांत घातला.

'ऐसे काय?' शिवाजीराजांनीं मातुश्रीचे पाणावलेले डोळे बघून विचारलं.

'आज नाहीं म्हणो नये. श्री सारे सिद्धीस नेईल.'

शिवाजीराजे खालीं वांकले, मातुश्रीच्या पायांवर त्यांनीं कपाळ घातलं. जिजाबाईनं त्यांना उठवून हृदयाशीं धरलं, कुरवाळलं. सभोंवतालचा मुकेपणाच बोलका झाला. आणि मातुश्रीच्या तोंडून दोनच शब्द आले 'विजयी भव.'

सौभाग्यवतींस धीराचे शब्द सांगून, लहानग्या संभाजीचा मुका घेऊन, भवानीला नमस्कार करून शिवाजीराजे साथीदारांच्या समवेत महालाच्या दाराशीं आले. दुःखालाहि दुःख वाटावं असं वातावरण कुंद झालं. इशारतीचा कर्णा वाजला.



भंवतींभंवतीं शिवाजीराजांनी भिरभिरती नजर फेकली तर त्यांना आवडती घोडी कुठं दिसली नाहीं. त्याऐवजीं त्यांच्या पुढ्यांत पालखी आली. शिवाजीराजांनीं लगेच मोरोपंतांना विचारलं, 'पेशवे, गडाखालीं मासाहेबांचे येणे होणार नसे, तर ही पालखी कशास?'

'महाराज, आजवर मराठ्यांस कोणी राजा नव्हता. आज आपण मराठ्यांचे राजे म्हणोन सदरेला जात आहां. पालखीचा इतमाम याकारणें योग्य असे. आम्हां सर्वांच्या चित्तीं आले त्याचा आपण स्वीकार करावा,' मोरोपंतांनीं सांगितलं.

'पेशवे, पण समय लढाईचा गुदरला तर पालखीची अडचण सांगतां पुरवणार नाही.'

'महाराज, कांहींहि असो, आज तुम्हीं पालखीच्या इतमामानेंच सदरेला गेले पाहिजे. आमच्याहि नायकाचें मोठेपण अवलोकन करोन त्यांनाला डोळे मिटो द्यावेत. हे तानाजी मालुसरे हे येसाजी कंक, हे हिरोजी फर्जंत, हे जिवबा माहला, हे पंताजीपंत बोकील आदीकरोन सान्यांच्यावर आपल्या जिवाची जोखीम असे. यासमयीं आपण आम्हां सर्वांचे ऐकिले पाहिजे.' पेशवे म्हणाले, अगदीं आर्जवून म्हणाले.

शिवाजीराजांनाहि गोड पेंच पडला. स्वराज्याच्या कामांत झालेल्या सर्व साथीदारांच्या कर्तृत्वावर त्यांचा विश्वास तर होताच पण त्याचबरोबर भिस्तहि होती. त्यांची निर्णयाची कुवत दांडगी होती. पुढं आलेल्या प्रश्नाचे प्रमुख वैशिष्टय त्यांच्या आकलनशक्तिला नेहमी सन्मुख होत असे. लोकांना सांगायचे असेल तर लोकांचेंहि ऐकलें पाहिजे. मान डोलवून शिवाजीराजे हंसत म्हणाले, 'तथास्तु तथास्तु. तुम्हां सर्वांची आदराची आज्ञा आम्हांला मान्य असे.'

आणि शिवाजीराजे पालखींत बसले.

एका बाजूनं शिवाजीराजे सदरेला आले तर दुसऱ्या बाजूनं अफझलखान आला. खानाच्या वैभवाला उपमा नव्हती, तर शिवाजीराजांच्या जिद्दीला उपमा नव्हती. खान उंच कां ताड उंच असा संभ्रम पहाणाऱ्याच्या मनांत उत्पन्न व्हावा अशी खानाची देहबांधणी होती, तर शिवाजीराजे खानाच्या खांद्यालाहि न लागणारे.

किनखापी मंडपाच्या सदरेवर आल्यावर नजरानजर होतांच खानानें वकिलाला विचारले, 'लोग शिवाजी शिवाजी कहते है तो यही है क्या?' कृष्णाजीपंतांनी होकारार्थी मान हलविल्याबरोबर शिवाजीराजांनीहि पंताजीपंतास विचारले, 'खान हेच कीं काय?' पंताजीपंतांनी होय असें उत्तर दिलें. खान हंसत पुढं झाला तितकेच हंसून शिवाजीराजेहि पुढें झाले. त्यांच्या स्मरणांत तेव्हां फक्त भवानी होती, मासाहेब होत्या. दराज खानानें शिवाजीराजांना खसकन पुढें ओढून बगलेत दाबून धरलं आणि डोळ्याचं पातं लवण्याआधीं शिवाजीराजांच्या अंगावर कट्यारीचा वार केला. पण वार त्यांच्या अंगावरल्या जिऱ्यावर खरखरला. काय झालं हें कुणाला कांहीं कळण्याआधींच प्रसंग जाणून शिवाजीराजांनी खानाच्या पोटावर वाघनखें चालवली. लोण्याच्या गोळ्यावर सुरी फिरवावी तसा प्रकार झाला. खानाची आंतडी परापरा बाहेर आली. खानाची पकड ढिल झाल्याबरोबर शिवाजीराजांनीं आपली मान सोडवून घेऊन खानाला ढकलून दिले. दगा दगा असं ओरडत डाव्या हातानं पोटाला सावरीत खानानं शिवाजीराजांच्यावर तलवार हाणली. जिरेटोप किंचित तुटला आणि गव्हाएवढी जखम झाली. चपळाईनं त्यांनी खानाचा वार चुकवला आणि तिरमिरणाऱ्या खानांवर भवानी तलवारीचा वार चढवला. तेव्हां जलदी करून सैद बंडेखान पठाण सदरेवर आला आणि राजांच्या अंगावर धांवला. पण येसाजी कंकानं त्याला पुरा केला. खान मुडदा होऊन पडतांच गोविंदपंत दिवाण मिठाला जागून पुढं आला तेव्हां तानाजी मालुसरे आणि जिवबा माहला यांनी त्याजवर पट्टा चालवला. शिवाजीराजांना ते खपलं नाहीं. त्यांनी ताकीद दिली, 'चाकरीचा ब्राह्मण असे. पुरा करूं नका.' म्हणून दोघांचा पट्टा थांबला. गोविंदपंत शरण आला. या हातघाईंत भोईखिजमतगार यांनी खानाचा मुडदा पालखींत घालून पळवण्याची कोशीस केली. पण येसाजी-तानाजीनं त्यांना कापून काढलं. लगा लगा शिवाजीराजांना घेऊन भोयांच्या कुच्या केल्या. राजांना गडाच्या वाटेला लावलें. आपण मागें तोंड देत राहिले.

भवानीच्या मूर्तीकडे डोळे लावून जिजाबाई बसलेली होती. तेव्हां शिवाजीराजांच्या यशस्वी येण्याची वार्ता दासीनं तिला सांगितली. वार्ताच अशी होती कीं देहभान हरपलं नसतं तरच नवल. अधीरपणानं येऊन तिनं 'शिवबा तूं आला आला' करीत शिवाजीराजांना पोटाशीं धरलं. शिवाजीराजेही मातुश्रीच्या कुशींत पिलासारखे शिरले. त्यांचेहि डोळे ओलावले.

'शिवबा...शिवा...भेटी जाहली...दिवस सोनियाचा उगवला,' जिजाबाई शिवाजीराजांना अंगभर चांचपत म्हणाली. मावळ्यांचाहि तिला विसर पडला. डोक्याची जखम बघून तिनं घाबऱ्या घुबऱ्या विचारलं, 'हें काय?'

'मामासाहेब, ही अफजलवधाची आठवण असे.' हंसत शिवाजीराजांनी उत्तर केलें.

'ठीक ठीक. पण वैद्यबुवांना आधीं बोलवोन घ्या कोणीं. वायू होईल येवढेहि कोणास कळत नसे?' जिजाबाईनं विचारलं आणि मोरोपंत पेशव्यांनी लगबगीनं तशी व्यवस्था केली.

तरी शिवाजीराजे म्हणालें, 'येवढे काय? शिपाईगिरींत जखम होणे अघटित नसे. असें भय नको. आधीं शिवबाची जखम बांधा. पेशवे, तुम्ही इशारतीची भांडी वाजवा. या जखमेच्या कवतिकांत जोखमीचा विसर न पडो.'

शिवाजीराजांचा जोखमीचा शब्द पडला नाही. तोफांचा आवाज झाल्याबरोबर खानांच्या गोटांत भेटीच्या तोफा झाल्या असं वाटलं. पण ही इशारत कळतांच, ठरलेल्या आदेशाप्रमाणं मावळे सरनोबत खानाच्या गोटावर चालून आले. स्वतःचाच विजय होणार या कैफांत धुंद असलेल्या खानाच्या गोटाची मावळ्यांच्या या अचानक धाडीनं दाणादाण उडाली. मावळ्यांनी खानाच्या तोफा आणि बुरगे दस्त केले. खानाच्या पाडावाच्या वार्तेनं हतवीर्य होऊन खानाचं सैन्य पळूं लागलं. खंडोजी खोपड्यानं खानाचा कबिला मात्र कोयनेकांठानं कऱ्हाडीं पावता केला. पण खोपडा हातीं लागतांच त्याचा शिरच्छेद केला. मावळाच तो पण खानाला जाऊन मिळालेला. चौदा हजार घोडे, पाऊणशें हत्ती, दोन तीन हजार ऊंट




वैल, तीन लाखांचे जवाहीर, सात लाखांची रोकड धनदौलत शिवाजीराजांना प्राप्त झाली. कृष्णाजीपंतांना सरनोबतांनी बंदी केलं. मोठमोठे पुराणवृक्ष तोडून वाटा बंद केल्या होत्या म्हणूनच ही कोंडी होऊं शकली.

शिवाजीराजांच्या आणि जिवबाच्या जखमा वैद्यबोवा बांधीत होते तेव्हां येसाजी कंक व तानाजी मालुसरे तिथं हजर झाले. खानाचं डोचकं कापून त्यांनी तें रुमालांत बांधुन आणलं होतं. तें विक्राळ डोचकं बघून जिजाबाईनं तोंडावर हात ठेवुन म्हटलं, 'खान ऐसा होता ?'

शिवाजीराजांनी खुषीनं विचारलं, 'मग काय फुलासारिखा ?'

'शिवा...तुजसी सरेच मामुली वाटतें. भवानीचा आशिर्वाद म्हणोन सारें निभावलें,' जिजाबाई गहिंवरून म्हणाली.

कृष्णाजीपंत, गोविंदपंत यांच्याबरोबर वरकड सरदार मातबर सापडले त्यांची शिवाजीराजांनी वस्त्रें देऊन पाठवणी केली. वैऱ्याचा सत्कार करण्याची ही अजब तऱ्हा मोरोपंत पेशव्यांना मानवली नाहीं. तसे ते राजांना बोललेहि पण राजे उत्तरले, 'पेशवे, ती पण आपलीच मंडळी आहेती. तूर्त वाट चुकलीत. केव्हांतरी त्यांसी उपरती होईलच. सूड घेण्यांतहि पद्धत असे.' पेशवे त्यावर गप्प झाले.

पेशव्यांच्यापासून साध्या मावळ्यापर्यंत सर्वांना शिवाजीराजांनी त्यांच्या श्रमपराक्रमाचा आदर करून वस्त्रें, भूषणें दिली, तैनाता वाढवून दिला, पालख्या अबदागिऱ्यांची खैरात केली. 'तुम्ही सारे होता म्हणोन राजे खैर होवोन आले.' या जिजाबाईच्या उद्गारातली भावना शिवाजीराजांनी अंमलात आणली. मावळ्यांच्या जखमावर उपचार तर केलेच पण कामास आलेल्यांचे लोक चाकरीस ठेवण्याची, त्यांच्या बायकांना पोटगी देण्याची, अनाथ बालपरवेशी करण्याची आज्ञा दिली. पंताजीपंत गोपिनाथ बोकील या वकिलानें अफझलखानास सदरेस आणण्यांत यश मिळविलें म्हणून त्याला राहाते गांव मौजे हिवरे इनाम करून दिलें आणि वर एक लक्ष होन रोख बक्षीस दिले. अशावेळीं स्वाभाविक आदरभावनेचा उद्रेक कवित्वाच्या रूपानं अज्ञानदासाच्या तोंडून आला तेव्हां शिवाजीराजांनी त्याच्या हातांत शेरभर सोन्याचा तोडा घालून घोडा बसायला दिला.

जिजाबाईला किळस येऊन खानाचं डोचकं तिथून हलविण्याची तिनं येसाजीला आज्ञा दिली. येसाजी रुमाल सांवरूं लागताच शिवाजीराजांनी विचारलं, 'नेणार कोठे ?'

'नेणार ? वैऱ्याच्या डोचक्याला कोल्ह्याकुत्र्याच्या तोंडाखेरीज जागा नसे महाराज,' येसाजीनं सांगितलं.

येसाजीचं कडवट बोलणं ऐकून शिवाजीराजांचा विवेक बावटळला. त्यांच्या मनोधारणेला येसाजीचं उत्तर रुचलं नाहीं. त्याच्या मनांत आलं, कोल्ह्या-कुत्र्यांच्या पुढ्यांत मुद्दाम डोचकें टाकावें ? अजब ...अजबच नोहे भयानक. अफजलखानाच्या शेखीचे त्यांसीं फळ मिळाले तरी तो शिपाईगिरीत समर्थ होता. वीराचा सत्कार वीरानेंच करणें योग्य. कोल्ह्या-कुत्र्याच्या तोंडी मुद्दाम डोचकें देण्याची रीत आपली कैसी म्हणावी ? वैऱ्याच्या हातांत शस्त्र नसते तर शस्त्र देवोन आपले वाडवडील धर्माच्या आज्ञेनें लढत आले. धर्माशिवाय स्वराज्य नसे व स्वराज्याखेरीज धर्म कवडीमोल. धर्म तरी आपण चिंतितो कैसे, वागतो कैसे यापरता दुजा काय असे ? दोन्ही राखण्यासाठीं आपण कपटी खानाचा पोटला फाडला, पण वैऱ्याचा मरणोत्तर अपमान करणें आपल्या रीतीरिवाजास मंजूर नसे...योग्य नसे...योग्य नसे...

'येसाजी' शिवाजीराजांनी साद घातली.

'जी महाराज' येसाजीनं मस्तक नम्र करून म्हटलं.

'आपली चीड आम्ही जाणीत असो पण धर्मयुद्धाचा शेवट ऐसाच व्हावा काय ? वैऱ्याचें डोचकें कोल्ह्या-कुत्र्याच्या तोंडी टाकण्यापरता दुसरा मतलब करणें रास्त नसे काय ?' शिवाजीराजांनी रोखून विचारलं.

येसाजी काय बोलणार ! त्यानें मोरोपंत पेशव्यांच्याकडे पाहिलं. पेशवे पुढें होऊन म्हणाले, 'महाराज, आपल्या वचनांचा रोख मी ताडला असे. मी अल्पमती, तरी सांगण्याचें धाडस करणें प्राप्तच. वैऱ्याच्या वरकड सरदारांना आपण वस्त्रें लेवून पाठवणी केली, इतपत हिंदवी रिवाज पाळणे योग्य जाहले. पण खानाचें डोचकें मराठ्यांनी कोल्ह्याकुत्र्याला घातलें या खबरीनेंच तांब्यांना वचक बसेल. आपलें अभय म्हणोन बोलतो कीं धर्माची चाड म्हणावी तर विजयनगरच्या राजपुरुषाचे डोचके या तांब्यांच्याच भाऊबंदांनी स्नानाचे पाणी जाण्या करितां वापरले होते याची जाण असावी.'

'पेशवे, तें सारें खरें पण मन कौल देत नसे. स्वराज्याच्या व धर्मरक्षणाच्या कामांतल्या वैऱ्यांस आम्ही जिवानिशीं मारलें असे येथवर आमची कामगिरी संपली. पण त्याच्या डोचक्याचा आपण मनुष्य असोन अपमान करणें योग्य नसे. खानाच्या डोचक्याचा अपमान न करण्यांतच आमचाच काय पण साऱ्या मराठ्यांचा गौरव असे. पेशवे, आपण पुन्हां विचार करावा.'

'महाराज, आपण म्हणाला तैसें प्रमाण असे.' पेशव्यांनीं सांगितलं.

तेव्हां शिवाजीराजांनी मातुश्रीला विचारलें, 'मासाहेब, आपलें काय म्हणणें ?'

जिजाबाई म्हणाली, 'मी जन्म दिधला म्हणोन मी ज्ञानी नसे. शिवा तूं करशील तें विचारच करशील येवढी माझी श्रद्धा असे.'

जिजाबाईचं बोलणं ऐकून शिवाजीराजे जरा विचारमग्न झाले. प्रत्येकाच्या चेहऱ्यावर कुतुहलानं ठाण मांडलं. खानाच्या डोचक्याकडे राजांचे डोळे वळले. खानाचे डोळे उघडे होते; पण त्यांत दृष्टी नव्हती.

— आणि सगळ्यांच्याकडे बघून शिवाजीराजे निश्चयी सावधपणानें म्हणाले, 'पेशवे, खानाचे डोचकें कोल्ह्या-कुत्र्यांचे तोंडीं देवो नये. वाईच्या दिशेस गडाला बुरुज नसे तेथें हे डोचकें पुरून बुरुज बांधोन त्यासी अफजल बुरुज या नांवे बोळखा. आणखी सदरेस खानाचा मुरदा पडला तेथें त्याची कबर बांधोन दिवाबत्तीच्या खर्चाची नेमणूक करा.'

शिवाजीराजांचीच आज्ञा ती, दिशांना भेदीत गेली; काळसुद्धां थांबून विचार करूं लागला. ●●●







*भारताचे ब्रिटिश राजवटींतील ग. ज. लॉर्ड ऑकलंड यांच्याबरोबर त्यांची बहीण एमिली इथें आली — सहा वर्षें राहिली. भारताच्या दक्षिण उत्तर भागांत तिनें बराच प्रवास केला. ती व तिची बहीण या दोन 'ईडन भगिनींनी नोंदलेल्या हकीकतींची' ही सुरम्य कहाणी—*



— शामराव निलकंठ ओक

श्रीमंति बायजाबाई शिंदे, ग्वालियरच्या राजमाता यांच्याकडून बड्या लाटसाहेबांना आमंत्रण...... बडे लाट ऑकलंड यांचे खाजगी कारभारी मेजर बर्न यांनीं सांगितलें कीं गव्हर्नर जनरल किंवा त्यांच्या बहिणी यांनीं आमंत्रण स्वीकारूं नये हें बरें. लाटसाहेबांनीं व त्यांच्या बहिणींनी शिष्टाचार म्हणून काय करावें व काय करूं नये हें मेजर बर्न कसोशीनें सांगत व तेंहीं पूर्वीच्या रिवाजांचा आधार देऊन. लॉर्ड विल्यम बेंटिंक या पूर्वीच्या बड्या लाटांनी अमुक केलें किंवा केलें नाहीं म्हणून नव्या ग. जनरल-नेही रूढीप्रमाणेंच वागावें हा मेजर बर्न यांचा आणि कंपनीच्या सार्‍या नोकरग्रहांचा कटाक्ष. तथापि लॉर्ड ऑकलंड प्रसंगीं पूर्वसंकेत बाजूला ठेवीत, आणि त्यांच्या बहिणी एमिली व फॅनी यांना तर मेजर बर्नचा शिष्ट सल्ला धुडकावून देण्यांत विशेष आनंद वाटे.

मेजर बर्न्सच्या मतें बायजाबाई शिंदे कारस्थानी म्हणून संशयित असल्यामुळें त्यांच्या जवळपासही जाऊं नये. त्याप्रमाणें त्यांच्या आमंत्रणाला अदबीनें नकार लिहून पाठविण्यात आला, पण बायजाबाईनीं चिकाटीनें पुन्हां निरोप, पत्रें, माणसें आणि नजराणे पाठविण्याचा सपाटा लावला. अखेर मेजर बर्न स्वतः बाईना सांगायला गेले. पण तेच नामोहरम होऊन परत आले आणि आतां लाटसाहेबांना सांगू लागले कीं बाईकडे जायला तशी कांहीं हरकत नाहीं. तथापि अगोदर 'कां जाऊं नये' ही मेजर बर्ननी इतकी खात्री करून दिली होती कीं आतां लाटसाहेबांनी जांण्यास पूर्ण नकार दिला. आपल्या बदली बहिणींना जाऊं द्या असें त्यांनीं सांगितलें—आणि नेमकें तेंच मेजर बर्नना नको होतें ! हें बोलणें निमूटपणें ऐकत असलेल्या एमिलीनें सांगितलें कीं मीं व माझी बहीण बायजाबाईकडे अवश्य जाऊं.

ही सव्वाशें वर्षांपूर्वीची एक हकीगत. जॉर्ज ईडन उर्फ लॉर्ड ऑकलंड हा गव्हर्नर जनरल कलकत्त्याहून मोठ्या परिवारासह व शिबंदीच्या बंदोबस्तांत गंगानदीमार्गें उत्तरेकडे दौरा करीत होता. डिसेंबर १८३७ मध्यें प्रयागला पोहोचल्यावर अलाहाबाद किल्ल्यांत बड्या लाटसाहेबांचे डेरे ठोकले होते व भेटी–प्रतिभेटी दरबार, बॉल मेजवान्या वगैरे औपचारिक कार्यक्रमांची धमाल उडाली होती. त्यांतच एक दिवस कुमारी एमिली ईडन व कुमारी फॅनी ईडन या बड्या लाटांच्या बहिणी बायजाबाई शिंदे यांच्या भेटीस समारंभपूर्वक गेल्याबरोबर दुभाषीण म्हणून मिसेस मॅक्नॉटन यांना घेण्याचें त्यांनीं मुद्दाम टाळलें, कारण आपण न बोललेले शब्द त्या बाई भाषांतरांत ठोकून देतात असा या बहिणींना संशय होता.

बायजाबाईनी पाहुण्यांना घेऊन जाण्यासाठीं लाल मखमलीनें मढवलेल्या सोन्याच्या पालखीतून आपली नात पाठविली होती पण ईडनबहिणी आपापल्या गाड्यांत बसून गेल्या व नातीची पालखी त्यांच्या बाजूने जात राहिली. पालखीबरोबर लवाजमा म्हणून सहा कुणबिणी धावत होत्या व दागिन्यांनी नटलेल्या घोडेस्वार मराठणींचें एक पथक मागून येत होतें. फॅनीनें पाहिलें कीं घोडे चालू लागतांच

---

'दि गोल्डन इण्टरल्यूड' –संपादिका : जॅनेट डनबार, प्रकाशक : जॉन मरे, लंडन–१९५३–किंमत १०॥ शिलिंग.










त्या बायांनी आपल्यां नथा नाकातून काढून ठेवून दिल्या. पालखीतल्या नातीखेरीज तिचा एक मामा हिरव्या-निळ्या रंगांनीं रंगवलेल्या हत्तीवरून मिरवणुकींत सामील झाला होता.

बायजाबाई : एक भव्य व तेजस्वी वृद्ध बाई. त्यांनी अघळपघळ शब्दांत लाटसाहेबांच्या बहिणींची तारीफ केली, त्यांना आग्रहानें पाचूचे व हिऱ्याचे कंठे भेट दिले, पाचूच्या आणि मोत्यांच्या बांगड्या नि आंगठ्या दिल्या, शालू शेले दिले. हें सर्व नजराणे कंपनी सरकारच्या खजिन्यातच जमा होणार हें बाईंना पुरें ठाउक होतें, आणि दुभाष्यामार्फत त्या दोघी बहिणींचें मन वळविण्याचा प्रयत्न करीत होत्या—कीं हे दागदागिनें तुम्हीं दोघी आपल्या स्वतःसाठीं ठेवा, कंपनीच्या खातीं दाखल करण्यासाठीं मीं तुम्हाला दुसरे सामान्य नग देतें. तें कसें अशक्य आहे हें शक्य तितक्या मुत्सद्देगिरीनें एमिलीनें हंसत समजावून सांगितलें. तथापि त्यांनीही बाईंना द्यायला नजराणे आणलेच होते, तेव्हां त्यांना अगदींच कांहीं नको म्हणता येईना, तेव्हां बाईंच्या समजुतीवर अगदीं मामुली अशा बारीकबारिक मोत्यांची नक्षी असलेल्या दोन आंगठ्या बहिणींनी स्वीकारल्या. मुक्कामाला परत आल्यानंतर एमिलीची आंगठी त्यांचा भाचा (व ग. ज. चा मिलिटरी सेक्रेटरी) विल्यम ऑसबर्न यानें त्यांच्या चान्स नांवाच्या कुत्र्याच्या शेपटीला बसवली—व त्यामुळें ती मेजर बर्नच्या नजरेतून सुटली!

महाराष्ट्रीय व्यक्तींचा हा एकच निर्देश जरी ईडनभगिनींच्या हकीकतीत आला असला तरी त्यांच्या बाकीच्या हकीकती तत्कालीन भारतातल्याच असल्यामुळें हृद्य वाटतात. तेव्हां पुण्याचें राज्य संपुष्टांत होऊन अठरा वर्षें लोटलीं होतीं. पेशवाई आटोपून मोकळे झालेले रावबाजी बिठूरला पेन्शन खात ब्रह्मकर्म करीत होते. साताऱ्याचे आणि कोल्हापूरचे छत्रपती, शिंदे, होळकर, गायकवाड, नागपूरकर भोसले हे कंपनी सरकारचे मांडलिक झाले होते किंवा होण्याच्या मार्गावर होते. मराठवाडा निजामाच्या राज्यांत होता, थोडक्यांत म्हणजे महाराष्ट्र जवळजवळ नामशेष होता. हिंदुस्थानच्या राजकारणावर परिणाम करण्याइतकी मराठी सत्ता अशी उरली नव्हती. मुंबईत बापू छत्रे 'इसापनीति' आणि 'बाळमित्र' लिहीत होते, बाळशास्त्री जांभेकर इंग्रजांना एतद्देशीय बुद्धिमत्तेची चमक दाखवीत होते, दादोबांचे व्याकरण जुळूं लागलें होतें, पुण्यांत परशराम तात्या गोडबोले मेजर क्यांडीला पहिला मराठी शब्दकोश तयार करण्यास सहाय्य करीत होते.

मुंबईबाजूच्या पश्चिम भारताआधींच मद्रासकडचा दक्षिण देश इंग्रजांच्या अमलाखालीं आला होता, पूर्वेकडे कलकत्त्याहून कंपनी-सरकारनें भक्कम बस्तान बसवलें होतें. मध्यभारत, राजपुताना या भागांतही कांहीं गडबड नव्हती. तथापि सिंधचे अमीर स्वतंत्र होते. पंजाबच्या लढवय्यांचे राज्य नुसतें स्वतंत्रच नव्हे तर कंपनीशीं बरोबरीनें बोलणीं करण्याइतकें प्रबळ होतें; कश्मीर प्रांत शिखांच्याच ताब्यांत होता, व पेशावर नुकतेंच महाराजा रणजितसिंहानें अफगाणांकडून जिंकून घेतलें होतें. काबूलचा पदच्युत अमीर शाहशुजा रणजित-सिंहाच्या आश्रयाला लुधियाना मुक्कामीं राहिला होता.

नेपोलियनच्या पराभवानंतर जरी इंग्लंड यूरपमधील अग्रेसर



एमिली ईडन

राष्ट्र ठरलें तरी रशिया त्याच्याशीं चढाओढ करीत होतें. रशियन साम्राज्य मध्य आशियाकडे फोंफावत जात होतें. दक्षिणेचा इराणचा भाग रशियानें गिळंकृत केला होता, काबूलच्या दोस्त महंमदाच्या दरबारीं रशियाचें वजन वाढत होतें—व दुसरीकडून रशियन गुप्त हेर इराणी फौजांना अफगाणी हिरातवर हल्ला करायला चेतवीत होते! रशियाचें परचक्र हिंदुस्थानपासून दूर ठेवलें पाहिजे यासाठीं, हिंदुस्थान व रशियन मुलुख यांच्या दरम्यान 'बफर' किंवा धक्केखाऊ राज्यांचे बुरूज उभे करावेत, असें इंग्लंमध्यें ईस्ट इंडिया कंपनीच्या बोर्ड ऑफ डिरेक्टर्सप्रमाणेंच पार्लमेंटच्या बोर्ड ऑफ कण्ट्रोललाही वाटलें व तसें करण्याचा आदेश देऊन लॉर्ड ऑकलंडची गव्हर्नर जनरल म्हणून नेमणूक करण्यांत आली.

ऑकलंड हा व्हिग पक्षांतला एक विश्वासू मंत्रि होता. मेलबोर्नच्या पहिल्या मंत्रिमंडळांत तो प्रथम व्यापार मंडळाचा अध्यक्ष व नंतर मुख्य आरमार मंत्री ही कामें पाहात असे. नंतर कांहीं दिवस टोरी पक्ष अधिकारावर आला पण पुन्हा जेव्हां मेलबोर्न पंतप्रधान झाला तेव्हां हिंदुस्थानकडची निकड जाणून त्यानें ऑकलंडची ग. ज. पदासाठीं निवड केली. ऑकलंडचें ईडन घराणें इंग्लंडमध्यें प्रतिष्ठा पावलेलें होतें—अथवा कालपरवाचे सर अन्थनी ईडन हे त्याच घराण्यांतले.] जार्जचा बाप सर रॉबर्ट ईडन यानें अनेक देशांतून इंग्लंडचा वकील म्हणून काम केलें होतें. त्याची आई ईलियट घराण्यातल्या लॉर्ड मिंटोची बहीण होती. ती बुद्धिमान्, कर्तबगार आणि सुशिक्षित असून कुटुंबपालनात विशेष तरबेज होती. तिला झालेल्या आठ मुली व सहा मुलगे अशा चौदा अपत्यांपैकीं आठ मुली व दोन मुलगे जगून मोठीं झालीं व त्यांनीं आपापले संसार सुखानें करीत आपापसांतले संबंध लोभाचे ठेवले. आईचा दहावा







मुलगा जॉर्ज वडील भावाच्या मृत्युमुळें लॉर्ड ऑकलंड झाला. तो जन्मभर अविवाहितच राहिला. बारावी एमिली व चौदावी फॅनी याही शेवटपर्यंत लग्न न करताच राहिल्या. बाकी सगळीं भावंडें लग्न होऊन आपापल्या घरीं गेलीं. पण या तीन ब्रह्मचारी भावंडांनीं आपलें एक घर ठेवलें. तिघेही सुविद्य आणि सुसंस्कृत, स्वभावानें शांत व मनमिळाऊ, समृद्ध परिस्थितींतही कर्तव्याची जाणीव ठेवून वागणारीं, आणि तिघांनाही विनोददृष्टी अचूक. एमिलीनें लिहिण्याची संवय ठेवली होती व ती आपल्या मैत्रिणींना आणि नातेवाईकांना सविस्तर आणि चटकदार पत्रें लिही. चित्रकला शिकल्यामुळें तिनें वेळोवेळीं डोळ्यापुढें आलेल्या दृश्यांचीं चित्रेंही भरपूर काढलीं आहेत. भावाची हिंदुस्थानांत नेमणूक झाली, सहा वर्षे दूर दुसऱ्या जगांत राहायचें, आपला देश, आपलीं माणसें, आपल्या हौशी, आपलें जीवन सारें सोडून एका अजिबात नव्या पद्धतीनें काळ कंठायचा, या कल्पनेनें एमिली प्रथम हादरून गेली, पण भावाचें घर तें आपलें म्हटल्यानंतर निश्चयपूर्वक येईल तें गोड करून घेऊन तिनें हिंदुस्थानातल्या सहा वर्षांत इतक्या हकीकती नोंदवून ठेवल्या कीं आज त्या वाचीत असतां देखील त्या बाईचें कौतुक वाटतें.

अशीं एमिलीचीं पत्रें, फॅनीनें लिहिलेल्या कांहीं हकीकती व भाचा विल्यम याची टिपणें, या सर्वांची सुसूत्र संगत लावून 'सोनेरी सहा वर्षे' हें पुस्तक तयार करण्यांत आलें आहे. त्यांत मुख्यत्वेंकरून लिहिणारानें स्वतः पाहिलेल्या व अनुभवलेल्या गोष्टी वर्णन केल्या आहेत. त्यामुळें त्यांना अस्सल ऐतिहासिक कागदपत्राइतकें महत्त्व आलें आहे. तथापि इतक्या सहजतेनें, मानवी भावनेनें आणि रसिकवृत्तीनें ही घटनांची नोंद झाली आहे कीं त्यांचा ताजेपणा सव्वाशें वर्षांनंतरही कमी झालासा वाटत नाहीं. लंडन सोडून गलबतांत बसण्याच्या तयारीपासून अखेर सहा वर्षांनंतर परत स्वदेशीं पाऊल ठेवीपर्यंत या तीन भावंडांचे दिवस कसे कसे गेले ते ओळीनें जोडलेल्या टिपणांनीं एकाद्या चित्रपटासारखे डोळ्यासमोर उभे राहतात.

जाण्याचा दिवस ठरला. सर्वांचे निरोप घेतले. पंतप्रधानांचें शुभेच्छेचें पत्र आलें. खुद्द राजा चवथा विल्यम यानें एमिलीला पत्र लिहून भावाबरोबर वाईट हवेत राहायला जाणाऱ्या बहिणींची तारीफ केली. नोकरचाकर, सामानसुमान सरंजाम, लवाजमा सर्व घेऊन जॉर्ज, एमिली, फॅनी व भाचा विल्यम पोर्टस्मथला जुपिटर नांवाच्या गलबतावर चढले. समुद्र प्रवासाचा एमिलीला फार त्रास झाला. फॅनीचा स्वभाव येईल तो प्रसंग गोड करून घेण्याचा होता. तिला नित्य नवें कांहीं असलें म्हणजे पुरे असे. मदीरा बेट करून जहाज दक्षिण अमेरिकेच्या रिओडी जानेरो बंदराला गेलें, तेथून दक्षिण आफ्रिकेच्या केपटौनला गेलें, व तेथून निघून बहात्तर दिवसांनीं कलकत्याला पोहोंचलें, एकूण सागर प्रवास पांच महिन्यांचा! कलकत्याला पोहोंचतांच गव्हर्नर जनरलचा बडेजाव सुरू झाला. समारंभ, औपचारिक संभाषणें, नोकरचाकरांचा सुळसुळाट, कलकत्याचा भव्य राजप्रासाद उष्मा, डांस, दहा मैलांवर नदीकाठीं बराकपूरचा बंगला व बाग, कुलकत्याचा युरोपिय समाज, गव्हर्नर जनरलचें रोज बारा तास काम, पार्ट्या, भेटी-प्रतिभेटी, हिंदुस्थानातला भयानक पावसाळा, इंग्लंडमधल्या स्वकीयांशी अखंड पत्रव्यवहार, नव्या नव्या वस्तूंची खरेदी अशा गोष्टींची नोंद पाहून, एमिली जेरीस आली असली तरी धीरानें आणि हंसतमुखानें दिवस काढीत होती हें दिसून येतें. फॅनी कांहीं दिवस एकटीच एका शीकारीच्या दौऱ्यावर गेली होती. तिची टिपणेंही मनोरंजक आहेत. इंग्लंडमध्यें महाराणी व्हिक्टोरिया गादीवर आली त्याप्रित्यर्थ गव्हर्मेंट हौसवर एक भरकेदार बॉल झाला. स्थानिक युरोपियन स्त्रिया पुरुषही एमिलीला मागासलेले व उथळ वाटले. निर्ळीचे मळेकरी व व्यापारी इंग्रज यांच्या ठिकाणीं माणुसकीचा अभाव आढळला. एतद्देशीय लोकांबद्दल इतकी हीन भावना कीं महाराजा द्वारकानाथ टागोर यांचेकडे बहिणींसह लॉर्ड ऑक्लंड मेजवानीला गेले याचा गोऱ्या लोकांत मोठा बोभाटा झाला.

उत्तरेकडे रशिया आणि हिंदुस्थान यांच्या दरम्यान मित्रराष्ट्रांचे बुरुज बांधण्याच्या धोरणानुसार गव्हर्नर जनरलनें पंजाबच्या महाराजा रणजितसिंहाशीं स्वतः भेटून तहनामा करावा व अफगाणिस्तानशीं दोस्ती करणाऱ्या रशियाला शह द्यावा, या आदेशानुसार ऑकलंडनें आपल्या परिवारासह व दहा हजार सैन्य घेऊन उत्तरेकडे दौरा सुरू केला. जलमार्गानें खास स्वाऱ्या गेल्या व सैन्यानें किनाऱ्यानें सोबत केली. कलकत्याहून निघून सुंदरबनाला वळसा घालून मुर्शिदाबाद, राजमहाल, मोंघीर, पटणा, गाझीपूर, बनारस, मिर्झापूर, अलाहाबाद, कानपूर, असा संथ प्रवास करून लाटसाहेबांचें लटांबर पुढें बरेली, अमरोहा, मेरठ, दिल्ली, कर्नाल, देहरादून, मसुरी या मार्गानें अखेर एकदांचें शिमल्याला येऊन थडकले. वाटेत पावलोपावली कांहींतरी नवीन दिसलेंच. सुंदरबनांत ठिकठिकाणीं पेंढी बांधून उभे केलेले कळक कशासाठीं ही चौकशी करतां तेथून वाघानें माणूस नेल्याच्या निशाण्या असें कळलें. पूर्व बंगालमध्यें भूमीला नरबली देण्याची चाल चालू असल्याचें कानावर आलें. बनारसच्या राणीनें दोघां बहिणींना भेट दिली व गुलाबाच्या अत्तरांत त्यांचे झगे माखून टाकले. अयोध्येच्या नवाबानें नजराणे पाठवून शिवाय एक खास आचारी दिमतीला दिला. रोज सकाळीं बारा पक्वान्नें तयार करून त्यांचा परामर्श बडे पाहुणे घेतात कीं नाहीं हें पहायला जातीनें येऊन उभा राहत असे!

प्रयागसंगमापाशीं गव्हर्नर जनरलच्या संपूर्ण परिवारानें गंगा ओलांडली. त्या कामगिरीला दोन दिवस लागले. नावांनीं वाहून साडेआठशें लादलेले उंट परतीराला पोहोचवले, शिवाय शेंकडो घोडे, गाडे व गाड्या एकशेचाळीस हत्ती पाठीवर तंबूच्या वळकट्या घेऊन पोहत नदीपार झाले, माहूत त्यांच्या डोक्यावर उभे राहून गेले. नंतर बॉडीगार्ड व पलटणींचे सोजीर आणि सर्वांच्या शेवटीं हजारों छावणीमागचे पेंढार नावांनीं गंगा उतरून सैन्यामागें गेले. सगळे मिळून सुमारे बारा हजार लोक. ही सर्व मिरवणूक आग्रा प्रांतात दुष्काळाचा कहर चालू असतां त्यामधून गेली व कनवाळू वृत्तीच्या ईडन भगिनींना मानवी यातना पाहून पाझर फुटला. त्यांनी आपल्याकडून शक्य तितकें अन्न व पैसे भेटलेल्या पीडितांना दिले. दिल्लीला दीन कळा आलेली दिसली. तिथला संस्थानिक स्वतःला हिंदुस्थानचा बादशाह म्हणवीत असल्यामुळें भेटीला किंवा स्वागताला आला नाहीं. पण अखेर कंपनी बहादुर हीच खरी मलिका हें जाणून त्यानें नजराणे देऊन शाहजाद्याला लाटसाहेबाच्या भेटीस पाठवलें. मसुरीला युरोपियनांच्या मुलांसाठीं शाळा होत्या—ज्यांना आपलीं मुलें मायदेशीं शिक्षणासाठीं पाठविणें परवडत






नसेल अशा साहेबांच्या मुलांसाठीं. तेथें दूरदूर नोकरीवर असलेले इंग्रज केवळ हमालांच्या टप्प्यांवर सोंपवून आपल्या लहान मुलांना एकटीं शेंकडों मैल कसे निर्धास्तपणें पाठवीत हें पाहून एमिलीला आश्चर्य वाटलें. सिमल्याला पोहोचल्यावर बहिणींना स्वदेशीं आल्यासारखें वाटलें व सिमल्याचा मुक्काम त्यांनीं उत्साहानें गाजवला.

त्यांच्या आसपास नेहमीं राहणारा भाचा विल्यम ऑस्बर्न त्यांची खूप करमणूक करी. तो खादाड, खोडकर आणि थंड वृत्तीचा होता. त्याला आतां सरकारी काम मिळालें. कंपनी सरकारतर्फें वकिलात म्हणून बड्या लाटाचा फौजी चिटणीस कॅप्टन ओस्बर्न राजकीय चिटणीस मॅकनॉटन, एक एडीसी कॅप्टन मॅकग्रेगर व डॉक्टर ड्रमण्ड हीं मंडळी शेरेपंजाब महाराजा रणजितसिंहाशीं मैत्रीच्या तहाबद्दल बोलणीं करण्यास रवाना झालीं. विल्यमनें आपल्या कामगिरीवरच्या दिवसांची तपशीलवार नोंद करून ठेवली आहे. पंजाबच्या सीमेवर त्यांच्या स्वागताशाटीं कश्मिरी सुंदरींचें एक पथक तयार होतें (त्यांच्या सेनेचा अदबीनें अव्हेर करण्यांत आला) सतलजच्या काठीं आदिनगर येथें रणजितची छावणी होती. त्याचा नातू प्रतापसिंह वय वर्षें सात यानें वकिलातीचे स्वागत केलें. त्याच्या बुद्धीनें, सहज रुबाबानें, दरबारी व खानदानी वागणुकीनें विल्यमवर छाप पडली. तो सामोरा आला हें पाहून मुख्य वकील मॅक्नॉटन गरम झाला, पण त्याला हळूच सांगण्यांत आलें कीं 'राजकुमार शेरसिंह [रणजितचा लेकावळा] हेच वास्तविक आपल्याला सामोरे यायचे पण काल रात्रीं सिंहजींनी जरा जास्ती घेतल्यामुळें आज त्यांची तब्येत नरम आहे. माफी चाहतात.' छोट्या प्रतापसिंहाला छोटी तलवार, ढाल, बंदूक असा सारा रत्नजडित साज होता आणि त्याचा पांढरा घोडा मेंदीनें रंगवून लाल केलेला होता. बड्या लाटांनी नजर केलेलें सोन्याचें घड्याळ व छेडा स्वीकारताना त्यानें एक व्यवस्थित आभारप्रदर्शक भाषण केलें. शेवटीं तो म्हणाला तुम्ही लॉर्ड ऑक्लंड यांना सांगावें कीं शेरसिंहाचा पुत्र ब्रिटिशांचा नेहमीं मित्रच राहील इतकें बोलून त्यानें घोडा फिरवून दौड केली आणि त्याचे रक्षक त्याच्या भोवतीं घोडे उडवीत आणि नाचवीत बरोबर गेले. नंतर एमिली व फॅनी यांची त्याची जेव्हां भेट झाली तेव्हां त्याही पोराला पाहून खूष झाल्या.

रणजितसिंहाचा दरबार पाहून या टोपीकरांचे डोळे क्षणभर दिपले. इतकी भरगच्च जरीची आरास, इतकीं ठसठशीत विपुल आणि विविध रत्नें आणि ती मिरवणारे वेगवेगळ्या जमातींचे सरदार त्या लोकांनीं क्वचित् पाहिले होते. दिवाणखान्याच्या टोकाला सोन्याच्या खुर्चीवर पाय मोडून एक म्हातारा एकाक्ष मनुष्य अगदीं साधे कपडे घालून भेदक दृष्टीनें आणि हंसऱ्या ओठांनीं या इंग्रजांकडे पाहात होता. त्याच्या कमरेला एक जंगी मोत्यांची माळ होती आणि दंडाला एक प्रचंड हिरा बांधलेला होता. तो पंजाबचा सिंह रणजितसिंह होता आणि त्यानें कोहिनूर धारण केला होता. नादीरशहानें दिल्लीहून लुटून नेलेला तो हिरा आणखी एका अहमदशहानें नादिरकडून लुटला होता. आणि त्या अहमदशहाच्या मुलाकडून—काबूलमधून परागंदा झालेल्या अमीर शहाशुजाकडून












अनुक्रमणिका



## तो महाराष्ट्र हा प्यारा

मज महाराष्ट्र हा प्राणाहुनिही प्यारा
त्याचिया यशाचा झाडी अखंड नगारा
हो महाराष्ट्र हा प्यारा ॥
पंढरी, आळंदी, देहु भक्तिच्या मळ्या
नारळी-पोफळी-काजूंच्या घन राया
'साऱ्याच जिजाउ आपण आया-बाया'
ही संसार रमणी-हृदयीं करि झंकारा
तो महाराष्ट्र हा प्यारा ॥
भरघोस पिकें हीं कापुस, शाळू, साळी
राऊळीं शिवारीं घुमती सांज-सकाळीं
लावणी, पवाडा, अभंग, गोड भुपाळी
पुरुषार्थां चारहि लाभे ज्यांत निवारा
तो महाराष्ट्र हा प्यारा ॥
हा सह्याद्री तर कणाच कणखर ताठ
वाहती ज्यातुनी वीर-रसाचे पाट
वा र णा-को य ना-कृ ष्णा-गो दा कां ठ
परजल्या दुधारी जणुं खड्गाच्या धारा
तो महाराष्ट्र हा प्यारा ॥
नांदेड दख्खनी पावनतीर्थ शिखांसी
काश्मीर-वनश्री हो गोमांतकवासी
त्या रामगिरीहुनि निघती मेघ प्रवासी *
स्वप्नेंहि चिंतिलीं येति जिथें आकारा ×
तो महाराष्ट्र हा प्यारा ॥
भारता मिळावा अग्रपुजेचा मान
हे वांधुनि गांठीं एकच एक इमान
करुं निर्वाणीला तन-मन-धन कुर्बान
ही स्फूर्ति निरंतर देइ जेथला वारा
तो महाराष्ट्र हा प्यारा ॥

—यशवंत

* कालिदासाचें "मेघदूत" काव्य इथें अभिप्रेत आहे.
×"स्वप्नीं जे देखिलें रात्रीं तेंतें तैसेचि होतसे" रामदासांच्या ह्या प्रत्ययकारी उद्गाराची, नव्या महाराष्ट्र' राज्य निर्मितीनें पुन्हा प्रचीती आली आहे.

रणजितसिंहानें केवळ एकसारखा लकडा लावून हैराण करून काढून घेतला होता ! जरा जास्त ओळख झाल्यावर विल्यमला रणजितनें कोहिनूर दंडातून काढून जवळून पाहण्यासाठीं दिला, तेव्हां कोंबडीच्या अंड्याएवढा तो हिरा व बाजूचे कबुतराच्या अंड्याएवढे दोन मिळून तीन कोटींचें रत्न आपल्या हातांत आहे हें विल्यमच्या मनांत आलें !

रणजितसिंहाच्या सैन्यांत एक जनानी पथकही होतें. त्याची कंवल नांवाची करिमरी सुंदरी मुख्या होती. तिला त्यानें सात गांवें दिलीं होती. रणजित पुढें लौकरच वारला तेव्हां ती इतर राण्यांबरोबर चितेवर सति गेली. रणजितचें कवायती सैन्य इटालियन व फ्रेंच अम्मलदारांनीं शिकवून तयार केलें होतें पण म्हातारपणीं रणजित कंजुष बनल्यामुळें शिपायांचे पगार थकले होते व ते कितपत उत्साहानें लढतील याची त्या अम्मलदारांनाच शंका वाटत होती. महाराजा जरी चैनबाजीच्या शौकानें दुर्बळ झाला होता तरी त्याची बुद्धि तीक्ष्ण होती. तो धूर्त, संशयी व आंतल्या गांठीचा होता. त्यानें ब्रिटिश सैन्याबद्दल विल्यमला पुष्कळच खोदखोदून विचारलें. युद्धशास्त्रांत तो प्रवीण होता हें उघड दिसलें. त्याच्या प्रजेची त्याच्यावर विलक्षण भक्ति होती. इंग्रजांशीं तह करायला तो तयार होता, पण त्याचा ध्यानसिंग, युवराज खडकसिंग वगैरे दरबारी लोक विरुद्ध होते. अखेर त्यांना न जुमानतां रणजित तह करण्यास तयार झाला.

कांहीं दिवसांनंतर लॉर्ड ऑकलंड व बहिणी ही मंडळी लवाजम्यासह पंजाबांत आलीं. समारंभपूर्वक भेटीगांठी झाल्या. एमिलीनें महाराजांचे समोर बसवून चित्र काढलें. मोकळ्या मनानें गप्पा गोष्टी झाल्या. नजराण्यांची देवघेव झाली. ईडन कुटुंबावर रणजित खुष झाला. त्यानें जॉर्जला मुद्दाम गोविन्दगडला नेऊन आपलें शस्त्रागार व रत्नभांडार दाखविलें. नंतर सर्वांना अमृतसरला नेऊन सुवर्णमंदिर व मोत्यांच्या चादरीनें झांकलेला पवित्र ग्रंथसाहेब दाखविला. शहासुजाला अफगाणिस्तानच्या गादीवर बसविण्यासाठीं इंग्रज व रणजितसिंह यांचा तह ठरला. निरोप घेऊन लाटसाहेब व परिवार सिमल्याला परतले. लौकरच मॅक्नॉटन सैन्य घेऊन काबूलवर चालून गेला व त्यानें दोस्तमहमदाला हांकून देऊन शहासुजाला तख्तावर बसवलें. पण अफगाण लोकांना तें बिलकूल पसंत नव्हतें. कांहीं दिवसांनीं टोळीवाल्यांची बंडाळी सुरु झाली. दोस्तमहंमदाचा मुलगा अकबरखान प्रबळ झाला. काबूलमधलें इंग्रज सैन्य कोंडीत सांपडलें. तात्पुरता संधि करून परत येतांना खैबर खिंडीत सारेच्यासारे पांच हजार लोक मारले गेले ती दुष्टवार्ता सांगायला एकटा डॉक्टर ब्रायडन कसाबसा जलालाबाद छावणीपर्यंत येऊन पोहोचला !

पहिलें अफगाण युद्ध याप्रमाणें दुर्घटनेनें समाप्त झालें. सुरुवातीला लॉर्ड ऑकलण्डला शाबासकी देणारे विलायतेतले वरिष्ठ आतां त्याला दोष देऊं लागले, तसेंच त्याचे सल्लागारही. ज्या मॅक्नॉटनच्या अहवालांवर गव्हर्नरजनरलची इतकी भिस्त होती ते चुकीचे ठरले, खुद्द मॅक्नॉटनलाच अकबरखानानें बोलणीं चालू असतां ठार मारलें होतें.

(पान ६६ वर)










अनुक्रमणिका



— श्रीपाद काळे



कुमठेकरांची सून-निर्मला-जागी झाली, तेव्हां चांगलें उजाडलें होतें.... लावलेल्या खिडकीच्या फटींतून बाहेर चांगलें उजाडल्याचें स्पष्ट दिसत होतें. खोलींत सुद्धां अस्पष्ट उजेड दिसत होता. निर्मला उठली. विस्कटलेले केस तिनें सारखे केले. नवऱ्याचें तोंड उघडें होतें. आणि तोंडाच्या दोन्हीं बाजूंनीं लाळ खालीं ओघळली होती. त्याच्या श्वासाबरोबर नाकपुड्या हाल्त होत्या; आणि वाढलेली दाढी चमत्कारीक दिसत होती...

निर्मला दूर झाली. खोलीचें दार उघडून ती बाहेर आली. बाहेरच्या उघड्या रेजातून वरच्या नळ्यांच्या फटींतून-मिळेल तिथून उजेड आंत येत होता. तिची सासू अजून उठायची होती. सासरा केव्हांचा जागा होता, आणि रागावल्यासारखा तोंडानें 'हरे राम करीत होता. मनासारखें कांहीं झालें नाहीं, म्हणजे तो असेंच करी, आणि खाकरत राही.

निर्मला मागल्यादारीं आली. दोणीतल्या पाण्यानें तिनें खळखळाऊन तोंड धुतलें...देवाचें नांव घेतलें, आणि गोठ्याचा दरवाजा उघडला. दोन्ही म्हशी उठून उभ्या होत्या. पुढ्यांतलें गवत त्यांनी पुरते मळून टाकले होतें. आंगाखाली शेण मुताचा चिखल झाला होता. आणि त्या दोन्ही म्हशी खाण्यासाठीं दाव्याला हिसडा देत होत्या. निर्मला घरांत आली. चूलींतील कालची राख बाहेर काढून तिनें शेणी लावली. रॉकेल ओतून एक काडी पेटवून लावली, आणि एकदम विस्तव पेटला. रॉकेलच्या धुरानें सारें सैंपाक घर भरून गेल्यासारखें वाटलें. शेजारच्या चुलींत राखेच्या उबेवर एक मांजर देहाची मुटकुळी करून बसलें होतें. धूर झाल्यावर तें उठले, आणि त्यानें आपलें सबंध अंग फुलवले. त्याबरोबर लवीवर असलेली रखा उधळली. आणि रॉकेलच्या धुरांत ती मिसळून गेली.

*निर्मळा हे पहात होती. आणि तिला काळजी लागल्या-
सारखे झालें होतें, जवळचे नातेवाईक कोणीतरी
आजारी असल्यावर वाटतें, तसें वाटत होतें...
पुन्हा पुन्हा ती मनाची समजूत
घालीत होती ........*

---

म्हशींचीं दुधें काढून निर्मला घरांत आली, तेव्हां चहाला उकळी फुटली होती. अस्ताव्यस्त शरीराची तिची सासू उठली होती आणि मोरीवरच चमत्कारीक आवाज करून तोंड धुत होती. तिचें सारेच वागणें, आवाज करणारें होते. साधी शिंक आली, तरी शिंक संपल्यावर मागून आवाज काढी. जेवताना तिचा घास पोटांत गेल्या-पर्यंत पुढ्यांतल्या माणसाला समजत होतें. पाण्याची तांब्याची धार तोंड वर करून ती घेई, आणि तोंडांतले पाणी गिळतांना सुद्धां एक चमत्कारीक आवाज होई.

निर्मलेचा नवरा उठला होता. चूळ भरण्याचें साधें निमित्त करून चहाकरतां देहाची मुरकुंडी करून तो कोपऱ्यांत बसला होता. चासऱ्याचें नामस्मरण चाललें होतें. त्याला मनांतून चहा हवा असे. कितीहि वेळ दिला, तरी नकोसा नसे. पण घेतांना व्यसना (लोकांच्या) बद्दल चार शब्द बोलल्याशिवाय चहाचा घोट त्याच्या पोटांत जात नसे.

—गेली दोन वर्षे निर्मलेच्या हें परीचयाचें झालें होतें. या घरांत ती आली, तेव्हां असें कांहीं बघितलें, कीं चक्क ती डोळे मिटून घेई...नवऱ्याजवळ संस्कृति, संयम यांतलें कांहीं नव्हतेच. तेल गूळ तो विकत होता. गेल्या कांहीं वर्षांत त्याचें देहापेक्षां मोठे दिसणारें डोकें त्यानें फार छान चालवलें होतें आणि त्याच बळावर मॅट्रिक झालेली ही मुलगी त्यानें पटकावली होती. लग्न झालें नि खाऊ का गिळूं अशा वृत्तीनें तो वागायचा. पानसुपारी खायचा, आणि थुंकी झेलीत बोलायचा. दाढी खाजवायचा.... हें सगळें नवरा घरांत नसतांनासुद्धां निर्मलेला आठवायचें, आणि तिच्या अंगावर शिरशिरी यायची...जडलेल्या चिवट रोगाला माणूस जसें पुढें सरावते, तसें तिचें झालें होतें

—निर्मला मागल्या दारीं आली. रात्रीचीं उष्टी खरकटी तिनें घासायच्या जाग्यावर टाकलीं. खरकट्याचें शितकण टिपायला दोन कावळे चटकन् खालीं उतरले. उन्हें चांगलीं आलीं होतीं. काल पाणी घातलेल्या झाडांच्या मुळांत खडकडाट झाला होता. कालच्या दिवस-भराच्या उन्हानें गुलाबाचीं पानें गळल्यासारखीं खालीं लोंबत होतीं. तडीचा वारा सुटला होता आणि सारें आकसून गेल्यासारखें वाटत होतें.

—मागच्या पुढच्या अंगणांत फणसाच्या पातेरीचा खच पडला होता. निर्मला आपल्याशींच पण मोठ्यानें म्हणाली, 'या गोदीला हल्लीं अवदसा आठवली आहे. कामाला यायला कांहीं सुमार ! मऊ वाजायला आले, तरी हिचा पत्ता नाहीं !'

'—हातांत पोतेऱ्याचा बोळा घेऊन निर्मला देवपरापासून तुळशीवृन्दावनापर्यंत फिरवीत गेली...तिचा नवरा हलक्या हातांनीं सुपारी कातरीत होता. वडलांना आपलें व्यसन कळूं न देण्याची शिकस्त तो करीत होता.

—'इतक्यांत गोदी पाणंदीच्या मधल्या वाटेनें येतांना तिला दिसली. उजव्या हातांत पडीच्या आंब्याचा झोळंबा होता. बहुतेक सगळे आंबे ती धुंडाळत आली असावी. निर्मलेनें तिला पाहिली तेव्हां ती आंब्याची कोय नीट चुपीत होती. कोय फेकून दिल्यावर तेच हात तिनें झोळीला पुसल्याचेंहि निर्मलेनें पाहिलें होतें.

—गोदीनें आंब्याचा झोळंबा गवताच्या भाऱ्याखालीं नीट दडवला होता. पण कोणाचें लक्ष आहे कीं काय हें नीट पाहूले होते. आणि मग कुमठेकरांच्या अंगणांत येऊन तिनें हातांत केरसुणी घेतली होती.

'गोदे, बाहेर दुपार होत आली, अजून तुझा पत्ता नाहीं.' निर्मलेनें आवाज चढवून म्हटलें.

'आवशीचां आंग गरम झालां रातचां. धाकलो भाव रातसान काय झोपलो नाय.' गोदीचें हें रोजचें सांगणें. कदाचित् तिची आई या वेळीं सड्यावर कामाला सुद्धां गेली असेल.

...गोदीनें हां हां म्हणतां कामें आवरलीं. गोठा साफ केला, म्हशींचीं दावीं काढून त्याना पाणंदीनें वर केलें. मांडी घालून ती रहाटा-वर बसली, तेव्हां चांगलें ऊन आलें होतें.... गोदी पाणी लाटीत असतानाच तिचा भाऊ तिला बोलवायला आला होता. निर्मलेनें कारण विचारलें, तेव्हां गोदीला बघायला पाहुणे आल्याचें त्यानें सांगितलें. पाणी लाटून होत आलें होतें. पुरें लाटून जाण्याची गोदीची तयारी होती, पण निर्मलाचें तिला म्हणाली 'तूं जा लौकर—'

निर्मला खाली उतरली, रहाट सोडल्याबरोबर उलटा गेला, आणि खालच्या काठीवर मोघे आपटले. एरव्ही असें झालें, म्हणजे निर्मला तिला बोलत असे, पण आज ती बोलली नव्हती... गोदीनें भावाला वरंडीखालचा आंब्यांचा झोळंबा आणायला सांगितलें, आणि ती वाटेला लागली.

— गोदी वाटेला लागली, आणि तिचें लग्न आहे, हें निर्मलेच्या लक्षांत आल्यासारखें झालें. ओल्या अंगानें पाथरीवर ती तशीच थांबली. हातांतला पाण्याचा अर्धा तांब्या तसाच राहिला... गोदीची मूर्ति तिच्या डोळ्यापुढें आली. गेल्यावर्षी निर्मलेचें लग्न झालें, तेव्हां गोदी कमरेला फडकाच गुंडाळत होती. अंगांत कोणीतरी दिलेलें अघळ पघळ फाटकें घालत होती. गोदीला वर्षे कितवें, हें तसें नक्की कोणा-लाच माहीत नव्हतें, तरीं पंधरा वर्षांपेक्षां अधिक वय तिचें नव्हतें. तिची आई इथें कामाला येत होती, आणि तिच्या बाळंतपणापासून गोदी यायला लागली होती. तारुण्याची एवढीहि कळ तेव्हां तिच्या अंगांत नव्हती. गेल्या दिवाळीपासून ती लुगडें नेसायला लागली होती. केवढेंहि लुगडें असलें तरी ती खोचीत खोचीत पायाच्या घोट्यापर्यंत आणायची. तारुण्याच्या एवढ्याशा खुणा नुकत्या कुठे दिसायला लागल्या होत्या.... केस पुष्कळ होते, पण ते एकत्रित केलेले कधीहि दिसत नव्हते. जत्रेच्या दिवशीं पुष्कळ तेल लाऊन, आणि पिना लाऊन ती पुष्कळ वर आंबाडा बांधी, आणि मिळतील तसलीं भडक रंगाचीं फुलें वर माळी. फुलें अशी माळी, की तिचें एवढेंसें तोंड झाकून गेल्यासारखें होई.








—मूठभर बांध्याची गोदी निर्मलेच्या लक्षांत आली, आणि तिचें ओलें अंग शहारल्यासारखें झालें... गोदीचें लग्न ही कल्पना निर्मलेच्या मनाला डंख करून गेली.

स्वत:च्या नवऱ्याची खाऊं कीं गिळूं अशी नजर. तोंडांत पानाचा रस ठेवून तो घोळीत लुडबे बोलण्याची ओंगळवाणी संवय तिला आठवली आणि डंख मारलेल्या कल्पनेंतून एक कळ गेल्यासारखी निर्मलेला वाटली.

—दुपारची भांडी घासायला गोदीची आई आली, आणि गोदीचें लग्न ठरल्याचें तिनें सांगितलें...भांडी घासतांना जवळच्या दगडावर बसून निर्मलेनें विचारलें, मुलगा कुठें असतो, शिकलेला किती आहे. घरचें कितपत आहे—पण यांतलें कांहींच गोदीच्या आईला माहीत नव्हतें. गोदीला बघायला मुळीं तो आलाच नव्हता. त्याची पहिली बायको मेली आहे, एवढेच फक्त तिला माहीत होतें, गोदीच्या बापानें त्याला पाहिलें होतें. गोदी देण्याबद्दल चाळीस रुपये तो घेणार होता—गोदीच्या आईचा निर्मलेला राग आला. तिच्या लग्नाच्या वेळीं असेंच झालें होतें...कुमठेकरांच्या श्रीमंतीचेंच वर्णन घरांत प्रत्येकानें केलें होतें. मुलानें मधल्या महागाईत दाखविलेलें व्यापारी चातुर्य सगळ्यांना माहीत होतें. तिनें आपल्या बापाला तिच्या शिक्षणाबद्दल विचारलें होतें. तिचें विचारणें त्यांनीं मनावर घेतलें नव्हतें.



—संध्याकाळीं गोदीचा बाप आला.एरव्हीं तो कमरेला एक फडका बांधून फिरे. कमरेच्या कोयत्याच्या आकडीला दोन घुंगुर अडकवलेले असत नि चालतांना त्या खळखळ वाजत. डोकीचे केस वाढलेले होतें. नि त्यावरून त्याची लांब शेंडी पाठीवर मोकळी असे. आज त्यानें कोरें धोतर नेसलें होतें. कमरेचा करगोटा वर काढला होता. उद्यांच्या लग्नाचें घरगुती आमंत्रण करावयास तो आला होता. त्याच्याकडे पैसा असण्याची शक्यता कमीच होती. केव्हां तरी दहा रुपये त्यानें नेले होते. त्याच्या व्याजांत अजून चार दिवस मजुरीचे तो मोडीत होता. पण तो लग्नाची व्यवस्था बोलत होता. ती ऐकून निर्मलेच्या सासऱ्याला धाप लागल्यासारखें वाटत होतें. शंभर एक पान नाहीं म्हटलें तरी होणार होतें. दारूकाम आणायला हवें होतें. ताशेवाजंत्र्याला वीस रुपये ठरले होते उद्यां बाजारांत जाऊन थोडें सणंग घ्यायाला हवें होतें. निर्मलेच्या सासऱ्याच्या मतानें हा खर्च उगाच होतो आहे—याला पैशांची रास कुठें मिळाली कळत नव्हतें. पण ते कांहीं बोलले नाहींत. तोंडापुरते हो हो केलें होतें.

—तो माघारा वळला आणि निर्मलेच्या सासऱ्यानें त्याच्यावर तोंडसुख घेतलें. किती जणांना त्यानें फसवलें होतें, याची नोंद घेतली. आणि खांद्यावर उपरणें टाकून ते दुकानाकडे निघाले. हा दुकानांत मुलाला भीक घालणार—ही उधारी दोन जन्म फिटणार नाहीं—हा त्यांचा होरा होता.

निर्मला हे पहात होती. आणि तिला काळजी लागल्यासारखें झालें होतें. जवळचें नातेवाईक कोणीतरी आजारी असल्यावर वाटतें, तसें वाटत होतें...पुन्हा पुन्हा ती मनाची समजूत घालीत होती, गोदीचा नवरा तसा मोठा नसणार. अगदी लहान वयांत त्याचें लग्न झालें असेल, आणि लगेच त्याची बायको मेली असेल. असें बऱ्याच जणांचें होतें. एक लग्न नुसतें नांवाला होऊन जातें...कदाचित् तो मुंबईला रहात असेल. गोदी मग लौकर मुंबईलाच जाईल. जरा शहरची हवा लागली, कीं कसेंही माणूस उजगारतें...माहेरच्या घराजवळ अशीच एकाची बायको निर्मलेला आठवली. लग्न झालें, आणि ती नवऱ्याकडे आली, तेव्हां तिच्याकडे बघवत नव्हतें. काळेपणाला सुमार नव्हता. दांत पुढें होतें, आणि केस विस्कटलेले असत. नवऱ्याबरोबर ती मुंबईला गेली, ती पुढें चार वर्षांनी घरीं परत आली. स्वरूपांत नेटसपणा आला होता. केसांना सुंदर वळण लागलें होतें. केवढें तरी चक्र ती घाली, आणि वर जाळी बांधी. –तशीच गोदीहि बदलून जाईल. अशी बदलून जाईल, कीं इकडे पुन्हां येईल, तेव्हां तिला आपल्याला ओळखतांच येणार नाहीं...

—हें मनांत आलें, कीं निर्मलेला जरा बरें वाटे. आजारी माणसाचा थोडा ताप उतरावा आणि त्यानें पाणी मागावें तसें निर्मलेला वाटे...

—रात्रभर तिला मग गोदीचीच काळजी वाटत होती...नवऱ्यानें कांहींतरी कळकट कोटी केली, आणि निर्मला हंसली नाहीं, तेव्हां तो मग ओशाळला. निर्मलेच्या शिक्षणाची त्याला थोडीशी भीती वाटत होती. वापरलेला एखादा जाडसा शब्द चूकून बोलल्यासारखें त्याला केव्हां केव्हां वाटे...

—सकाळीं निर्मला लौकर उठली तेव्हां बाहेर पुरतें दिसत सुद्धां नव्हतें. आज कामाला कोणी येणार नव्हतें. भरभर तिनें कामे आटोपलीं अंग धुतलें, नवें लुगडें नेसलें, तेव्हां सास्वेनें विचारलें, 'आज विचार काय आहे. ?—'

'गोदीकडे जाणार आहे—'

'अगो, लग्न संध्याकाळचें आहे, त्यावेळीं हवी तर अक्षत टाकायला जा—'

'पण पुण्यावाचन सकाळींच होईल ना ?—'

'पण झालें तरी आमच्यांत सकाळपासून जायची चाल नाहीं—'

'जरी गोदीच्या लग्नाला सकाळीं गेलें, तरी कांहीं बिघडणार नाहीं—'

'पण यांना हें खपणार नाहीं—'

'मी रात्रीं इकडे विचारलें आहे—'

'मग काय म्हणाला ? '

'हां म्हणाले—'









—ओलणेंच खुंटल्यासारखी सासू मग गप्प राहिली. असें कुठें जायचें यायचें असलें कीं निर्मला नवऱ्याला विचारी. बायकोला संभाळण्याकरितां तो नाहीं म्हणत नसे. आणि मुलानें सांगितलें म्हणजे भांडणें नकोत, म्हणून तीं नवराबायको गप्प रहात असत. निर्मलेला हें इंगित माहीत झालें होतें. बरोबर कोणीतरी असावें म्हणून निर्मलेनें शेजारच्या मुलीला बरोबर घेतली.

निर्मला गोदीकडे आली, तेव्हां वाडींतले बापये गडी मांडव घालीत होते एक जण खळें सारवीत होता. तुळशीच्या कट्ट्यावर वाडींतला देऊ म्हातारा बसला होता आणि एकेकाला कामें सांगत होता. जोशी नुकताच आला होता. म्हाताऱ्यापुढें चंची सोडून तो डाव्या हातावर तंबाकू मळीत देवस्कीच्या कांहींतरी गोष्टी बोलत होता. निर्मला आलेली पहातांच सारेजण चपापल्या सारखे झाले. निर्मला येणें अनपेक्षित आणि आश्चर्याचें होतें...साडेदहाचा सुमार झाला आणि मंडप तयार झाला. कोणाच्या तरी दारांतली नुकती पोसवलेली केळ म्हाताऱ्याच्या सांगण्यानें कोणीतरी तोडून आणली होती. कोणाच्या तरी घरांतलें गणपतीच्या वेळीं मांडवीवर बांधायचे काचेच्या मण्याचें तोरण कोणीतरी आणलें होतें...मांडव सजला. ओल्या सारवणावर माशा घोंघावायला लागल्या.

जोशानें पाट मांडले. निर्मला गोदीच्या घरांत गेली. लहानसें खोपटीवजा घर होतें तें. एवढ्याशा लहानशा घरांत चार बिऱ्हाडें होतीं. आंत जायच्या दारांतून निर्मलेच्यो सासूला सहज आंत जातां आलें नसतें. एका कोपऱ्यांत गोदी उभी होती. हळदीनें सर्वांग मळलेलें होतें. केस कोणीतरी करकचून बांधले होते. नेसायच्या कोऱ्या लुगड्याचा बोंगा बराच वर आला होता.

—पुण्याहवाचनाला माणसें बसलीं तेव्हां ताशावर काठी बसली. सगळें घर एकदम जागे झाल्यासारखें झालें...निर्मलेला उमाळा येतो आहेसा वाटला. अंगावर बारीक कांटा फुलल्यासारखें तिला वाटलें. तासा वाजला आणि वाडींतलीं सारीं माणसें थव्या थव्यानें उभीं राहिलीं.

—निर्मला गोदीच्या पाटीमागें करवली सारखी उभी राहिली. गोदीनें दोन्ही गुडघ्यांत मान घातली होती. मधून मधून तिला हुंदका येत होता आणि तिचें इवलेसें अंग गदगदत होतें...गोदीची आई कोरें लुगडें नेसली होती. नमस्कार करतांना तिला पुरेसें होत होतें... डोकींतून घामाच्या धारा लागत होत्या. नाकांतली उभी नथ तुरुतुरु हालत होती...गोदीच्या बापाला कोरें धोतर सावरत नव्हतें. लहानशा पाटावर त्याला नीट बसतां येत नव्हतें...धड पुड्यांतल्या नारळ सुपारीला गंध लावतां येत नव्हतें, कीं धड पाणी सोडतां येत नव्हतें.

—निर्मलेनें गोदीला दोनदां हांका मारल्या. एकदांहि गोदीनें 'हूं' केलें नव्हतें.

...निर्मलेला वाटत होतें, गोदीनें आपल्या मनाची कुंचबणा आपल्याजवळ बोलावी. तिला जवळ घ्यावें, आणि चांगलें थोपटावें, तिचे डोळे पुसावे. तिनें पाणी मागावें, आणि आपण तें तत्परतेनें पुढें करावें...पण तसें कांहीं घडत नव्हतें. गोदी मुळीं बोलतच नव्हती. निर्मलेची अवस्था मुका मार बसल्यासारखी झाली होती. आंत जोराचा मार बसला होता, आणि रक्त फुटलें नव्हते....गोदीला बघितलें, कीं स्वतःच्या नवऱ्याची खाऊं कीं गिळूं अशी नजर तिला आठवत होती. तोंडांत पानाचा रस ठेऊन तो खालच्या जबड्यांत मेलींत बोलायची त्याची किळसवाणी सवय आठवत होती.

—पुण्याहवाचन संपलें, नि निर्मला घरीं यायला निघाली. येतां येतां जोशी म्हणाले, 'गोरज मुहुर्त आहे.'

निर्मला घरीं आली तेव्हां बारा वाजून गेले होते. तिचा नवरा अजून दुकानांतून यायचा होता. सासऱ्याचा राग बराच चढला होता. असा राग चढला, कीं स्वतःचा पंचा तो धुवून घाली, स्वतःचा तांब्या भांडे तो स्वतः घाशी. देवाचें नांव मोठ्यानें घेई, आणि जेवायचें पान वाढलें, तरी नुसता ताळवेवर हात फिरवीत राही. निर्मलेला सासऱ्याचा राग केव्हांच कळला होता. निर्मला घरांत येतांना डोळ्याच्या पापण्यापासून पिकलेल्या केसांतून त्यानें रोखून बघितलें होतें. डोळ्यांतली तांबडी रेषा रक्त फुटल्यासारखी दिसत होती. ओठ नुसते थरथरत होते. पुढें येणारा शब्द मागें परततांना त्याचा जीव कासावीस होत होता.

निर्मलेची सासू चुलींत फुंकर मारीत होती. लहानसे किटाळ असलेला. विस्तव तिच्या फुंकण्यानें नाहींसा होत होता....फुंकणींतून ती लांब हेल धरल्यासारखें करीत होती. निर्मलेनें लुगडें बदललें. ती घरांत गेली. तिला ऐकायला यावे असें अधांतरीं सासरा म्हणाला, 'दुपारी वास्तविक तिथें राहायला हरकत नव्हती—'

—मग तो खाकरला. खाकरण्यांतून अनेक अनेक अर्थ ध्वनित होत होते...

—तिचा नवरा घरीं आला. निर्मलेशीं कांहींतरी बोलला. आज पहिल्यानेंच निर्मलेनें त्याच्या जिवावर मनासारखी गोष्ठ केली होती...

संध्याकाळीं ती निघाली. गोदीला देण्याकरितां दहा रुपयाची नोट तिनें नवऱ्याकडून घेतली. कोऱ्या पाकिटांत ती घातली. जवळचा जरीचा खण घेतला. जणूं निर्मलेच्या जवळच्या नात्यांतल्या मुलीचें लग्न होतें—एका जिवा भावाच्या मैत्रिणीचें लग्न होतें. आज तिला जायलाच हवें होतें...

—निर्मला गोदीकडे आली. केर काढून कोणीतरी बैठक घालीत होतें. मोठ्या फटाक्यांचे आवाज निघत होते. डोळ्यांत पेंग घेऊन तासेवाला ताशावर काठ्या आपटीत होता. पातळ फुलें ओवून केलेल्या माळा बाहेरच्या खुंटीला लोंबत होत्या. माणसें येत होतीं. एक कोरा वास सुटला होता. जोशी तुळशीच्या कट्ट्यावर म्हाताऱ्याशीं देवस्कीच्या गोष्टी बोलत होता. सूर्य मावळायला जात होता. वास्तविक एव्हाना नवरा दारांत यायला हवा होता... आठदहा मैलावरून तो यायचा होता. ...पहावें, तर इथें अजून सामसूम होतें. घाई गडबड फारशी नव्हतीच. निर्मला घरांत गेली. गोदीची आई ओक्साबोक्शी रडत होती. असें रडणे जरा चमत्कारीक वाटत होतें. गोदी कोंपऱ्यांत बसली होती......

—दिवस मावळून गेला. तरीं नवऱ्याचा अजून पत्ताच नव्हता. लहानमोठीं माणसें नुसतीं आंत बाहेर करीत होतीं. कोणीतरीं अशाच एका लग्नाची हकीकत सांगत होते. बरेच वेळां ऐकलेली ती हकीकत नव्यानें ऐकावी, तशी कोणीतरी मन देऊन ऐकत होतें...

बत्ती लागली, आणि एक घामेजलेला माणूस धापा टाकीत आला. वऱ्हाड येतां येतां वाट चुकलें होतें. आतां मार्गाला लागलें होतें.... सबंध पाण्याचा तांब्या त्यानें तोंडाला लावला, तो रिकामा करून खालीं ठेवला... जरा वेळानें खरेंच ताशे वाजायला लागले...

( पान २६ वर )







# वरदात्री पयस्विनी



रघुवंश

सर्गः २



बा. भ. बोरकर

प्रजाधिपें नंतर सुप्रभातीं जायार्चिता धेनु सगंधमाला
यशोधनें बांधुनि तृप्त वत्सा बिमोचिली रान चरावयाला ॥ १ ॥
तिच्या खुरन्यास-पवित्र पंथें सतींत जी श्रीमति अग्रगण्या
चाले मनुष्येश्वर-धर्मपत्नी स्मृतीचशी मागुनिया श्रुतीच्या ॥ २ ॥
मागें वळायास कथून जाये यशःश्रियावंत दयालु राय
चतुः समुद्रस्तनमंडला ही धराचशी नाथ वळीत जाय ॥ ३ ॥
व्रतार्थ रायें करूनी विनंत्या निरोपिलें त्या उरल्याहि भृत्यां
नकोच त्या होति शरीर रक्षा, स्ववीर्यरक्षी मनुवंश जात्या ॥ ४ ॥
तो खाजवी, घांस भरी तृणाचे, घे श्रेयही दंश निवारणाचें
गाईस दे स्वैर फिरूं खुषाल, सरक्ष चित्तें बळगे नृपाळ ॥ ५ ॥
ती थांबता थांबुनिया, चलावें ती बैसतां आपणही बसावें
पितां तिनें तोय तयेंहि प्यावें ठावें नृपा साउलिसें असावें ॥ ६ ॥
त्यागूनियाही निज राज चिन्हें शोभे स्वयंजात नृपश्रियेने
जसा मदस्राव नसून देहीं अंतर्मदावस्थ गजेंद्र मोही ॥ ७ ॥
शिरीं लतांनीं कच बांधलेले, करीं सदाचें धनु ताणलेलें
राखावया धेनु असा फिरे तो हिंस्रां गमे दापित काय जातो ॥ ८ ॥
त्याच्यानुचारी अरुणासमाना पार्श्वद्रुमांनीं करुनी तनाना
स्कंधस्थ सानंद शकुंत शब्दें आवाहिलें त्या जयघोष नादें ॥ ९ ॥
दिव्याग्निसा भूप वनीं बघोनी भरून वारें सुमवल्लरींनी
केली तयाच्या शिरिं पुष्पवृष्टी लाह्याच कीं पौरसुता वहाती ॥ १० ॥
धनुष्यधारी जरि राय होता घडे दयेचा दिसला पहातां
विशंक दृष्टी खिळली जयांची फिरे धणी त्या मृगडोळियांची ॥ ११ ॥
भरून वारे वनवेळु सारे आलापिती वेणुसुरांत सा - रे
उच्चस्वरांनीं वनदेवतांनीं हें घातलें स्तोत्र तदीय कानीं ॥ १२ ॥
न्हाला तुषारीं गिरिनिर्झरांच्या कम्पे सुगंधी तरूचामरांच्या
सेवा करी वायु असा तयाची विछिन्न आतप तपोधनाची ॥ १३ ॥
शिरे वनीं वृष्टिविना वनाग्नी भारास ये सृष्टि फळाफुलांनी
बळी मुळींही दुबळ्या पिळीना येता वनी रक्षकराव राणा ॥ १४ ॥
फिरून म्हाणून दिगंतराला जाती विनांती अपुल्या घरांला
धेनु मुनीची नि उन्हें रविची कांतीत ती तांबुस पालवीची ॥ १५ ॥

ती देवीपितृद्विज कार्मलीना सन्मान्य भूपासह चालताना
शोभा तियेची बहुसाल वाटे श्रद्धाच साक्षात् विधियुक्त वाटे ॥ १६ ॥
तळीं रिकामी वनसूकरांची रुखावळी मोर विसावण्याची
तसे मृगारात्र तृणाल माळ ही सांवळी सृष्टि बघे नृपाळ ॥ १७ ॥
ती एक वत्सा निज कास भारे हा आपुल्या पुष्ट वपुप्रकारें
दोघेहि डौलांत डुलून जातां सुशोभिती आश्रम लक्ष पंथा ॥ १८ ॥
पाहून नाथा गुरु-धेनुमागें नेत्रीं सखीच्या अनुराग जागे
उपास आल्यापरि लोचनें ती उपास्यरूपास पिउन घेती ॥ १९ ॥
वाटेंत रायें अनुभारलेली दाराकरें पाहुणचार केली
ती धेनु शोभे उभयांत संध्या संतोषदात्रीं दिनरात्रमध्या ॥ २० ॥
शुभाक्षतापात्र धरूनी हातीं प्रदक्षिणा घाली सुदाक्षिणा ती
वंदी, पुजी धेनु कृपांग-जागीं विशाल शृंगांतर भाल भागीं ॥ २१ ॥
अधोनि वटसोत्सुक शांत राहो सेवून तत्पूजन मोद देई
भक्तांप्रती ही तिजसारख्यांचीं प्रसादचिन्हे पुढल्या फळांची ॥ २२ ॥
वंदून पायां गुरुदंपतीच्या संध्याक्रिया संपवुनी स्वताच्या
दोहून आणि सविराम धेनु भजे पुन्हां वीर दिलीप भानु ॥ २३ ॥
जिच्यापुढें ग्रास असे सदीप मागें बसे पत्निसवें दिलीप
ती झोंपवी संथ, वरी निजेतें उठे तसा ती उठतां पहांटे ॥ २४ ॥
व्रता अशा घेऊनिया सुतार्थी भार्येसवें तो महनीय कीर्ति
सनिष्ठ कंठी दिन एकवीस जो थोर दीनोद्धर मंगळेश ॥ २५ ॥
दिनीं दुज्या ती मुनिहोम धेनू इच्छून भक्तास कसून जाणूं
वाहे जिथें जान्हविचा प्रपात शिरे तृणाच्या हिमगव्हरांत ॥ २६ ॥
दुर्धर्ष हिंस्रांस असे मनेंही गणून, शोभा गिरिचीच पाही
सिंहें कुण्या तों चुकवून डोळा झेपावुनी ओढियलें तियेला ॥ २७ ॥
तों कोंडला हंबरडा तियेचा घे ठाव वेगें नृपकाळजाचा
तद्दष्टि जी होती नगेंद्र वेधी फांसें गमे कोणी तियेस ओढी ॥ २८ ॥
त्या लाल गायीवर बैसलेला धनुर्धरें केसरि देखियेला
सांध्याचिया कीं गिरिच्या पठारीं हा लोध्रसा येइ फुलून भारी ॥ २९ ॥
तैं वध्य सिंहास वधावयास भात्यांतुनी काढूं बघे शरास
शरण्य दीनांस अरींस काळ पराभवें क्षुब्ध गमे नृपाळ ॥ ३० ॥

धरातळीं तों खिळली कराग्रें नखप्रभा भूषवि कंकपत्रें
धारे असा अंतक सव्य हस्त चित्रापरी राय दिसे तटस्थ ॥ ३१ ॥
मंत्रौषधींनीं बलसद्ध नाग, राहे जसा जाळित आंत आग
दंड्यास दंडू नच दंड हाले म्हणोनि राजाहि तसाच पोळे ॥ ३२ ॥
सो धेनुपीडाकर सिंह तेव्हां मनुष्य वाक्यें मनुवंश सिंहा
स्वयंदशा विस्मित त्या दर्शित बोले नव्या लोटित विस्मयांत ॥ ३३ ॥
तें सोडिलें अस्त्र जरी इथें तूं भूपा! तुझे कष्ट निरर्थहेतु
ज्या वायुचा वेग तरूंस पाडी तो पर्वताग्रीं कर मात्र आडी॥ ३४ ॥
इच्छी बसूं जो शिव अष्टमूर्ति नंदीचिया त्या हिमगौर पृष्ठी
त्याचा पदस्पृष्ट निकुंभमित्र मी भृत्य कुंभोदर गा पवित्र ॥ ३५ ॥
हा देवदारू दिसतो पुढें ना ? तो लाडका पुत्रचसा प्रभूंना
त्या स्कंद-माता भरवी पयांनें सुवर्ण शोभाकलशस्तनानें ॥ ३६ ॥
कण्डूविनाशार्थ कुण्या गजानें विखंडिता साल मदस्थळानें
स्कंदीं बघोनी असुरास्त्र–घाय झाली तशी शोकविदीर्ण माय ॥ ३७ ॥
तेव्हां शिवें येथ गुहेंत मातें घालावया भीति वनद्विपांतें
नियोजिलें ठेवुनि सिंहवृत्ति खायास जे प्राणि समीप येती ॥ ३८ ॥
राखावया वेळ मम क्षुधेची घडी भरी देव अशी जिवेची
ती ये स्वयें शोणित पारणें शी राहुप्रती चंद्रसुधाच जैशी ॥ ३९ ॥
म्हणून तूं खंतिविना फिरावें कृतार्थ शिष्यत्व तुझें गणावें
स्वभावतः शस्त्र निरर्भ जेथें उणा न शस्त्रज्ञ प्रशांत तेथें ॥ ४० ॥
प्रगल्भ हें भाष्य मृगाधिपाचें श्रवूनियां चित्त नराधिपाचें
पराभवातें विसरे स्वभावे कुंठे गणी शस्त्र हरप्रभावें ॥ ४१ ॥
वज्रप्रहारक्षणिं वज्रपाणि खिळावला त्र्यंबक–लोचनांनीं
तसाच निष्पंद शरप्रयोगीं सिंहास दे उत्तर राजयोगी ॥ ४२ ॥
वाटेल हास्यास्पद बोलतों जें अचेष्ट मी आज निरुद्धतेनें
तरी जरा बोलतसें मृगेंद्रा जाणून तूं हृद्गत जाणणारा ॥ ४३ ॥
चराचराच्या त्रिविधस्थितीनें जो मूळ तो वंद्य त्रिवार मातें
लयास जातां गुरुहोमदेय तसेंच तेंही अनुपेक्षणीय ॥ ४४ ॥
म्हणून माझ्या कुडिनें कृपाळा खुषाल दे ग्रास तुझ्या क्षुधेला
पितें जिचें आतुरलें दिनान्तीं सोडीं परंतु मुनिधेनु गा ती॥ ४५॥
हांसुनि किंचित् शिवकिंकरानें दाढांचिया तोंच उजाळण्यानें
गुहांतला फाडुनि अंधकार पुनश्च भूपा कथिला विचार ॥ ४६ ॥
गा चक्रवर्तित्व उभ्या जगाचें तारुण्य, लावण्य असें वधूचें
हें सर्व थोड्यास्तव सोडणारा तूं भाससी मूढच मद्विचारा ॥४७॥
बळी असा भूतदयेस जातां होशील गाईसच जीवदाता
त्राता प्रजे नित्य पित्याप्रमाणें होशील गा तूं पण वांचण्यानें ॥४८॥
कोपानलें श्रीगुरु एकधेनु दंडील ही भीति नकोस मानूं
पुष्टस्तनी देउनि कोटि गायी निवारणें कोप अशक्य नाहीं ॥४९॥
म्हणून कल्याण परंपरेचा भोक्ता असा देह समर्थ साचा
रक्षीं, करीं राज्य भरास आलें हें इंद्रराज्याहुनि ना निराळें ॥५०॥
हें थांबतां बोलुनि सिंहराज उठे निनादून गुहेंत गाज
वाटे नृगा अद्रिहि मैत्ररागें उच्चस्वरें आशय तोच सांगे ॥५१॥
सिंहा मिठींतील बघुन गाये ती ज्याकडे व्याकुळदृष्टि पाहे
येती मुखी शब्द कृपाळु त्याच्या शिवानुगाची परिसून वाचा ॥५२॥

'क्षरांस तारी' म्हणुनीच प्रौढ जगांत या 'क्षत्रिय' शब्द रुढ
त्या आड वागून कशास राज्य ? निंदेमुळें प्राण मळीण त्याज्य ॥५३॥
गायी दुज्या देउन केविं ध्यावा ? महर्षि कैसा मजला बुझावा ?
जी रुद्रतेनें धरिली तुवां ही गुणी उणी ना सुरभीहुनीही ॥५४॥
स्वदेहमोलें म्हणुनी विमुक्त तिला करावें, मज हेंच युक्त
भुके तुझ्याही न पडेल खंड गुर्वाग्नि चालेल तसा उदंड ॥५५॥
सलक्ष हा रक्षिसि देवदारू सेवेंतला जाणसि सर्व घोरु
रक्ष्या मरूं देउनि रक्ष जीर्णे आम्ही कसें स्वामिसमोर जावें ?॥५६॥
तुझ्या मतें मी जरि वध्य नोहें राखीं दयाळा मज कीर्ति देहें
जो देह मातीस मिळावयाचा जा मत्समानां नच लोभ त्याचा ॥५७॥
संभाषणें सख्य जडे जिवांत तसें घडे हें अपुलें वनांत
शिवानुगा! राखुनि मैत्र–मान हो एवढी एक विनंति मान ॥५८॥
'बरें' असें त्या वदतांच सिंहें दिलीप तो निष्प्रतिबंध देहें
ठेवून शस्त्रें जणुं मांसपिंड द्याया सजे त्या निज देह खंड ॥ ५९ ॥
क्षणीं शिरीं उग्र उडी पडेल अशा विचारें सुकतां नृपाळ
घडे झडे लोककृपाळपृष्टीं विद्याधरां हातुन पुष्पवृष्टी ॥ ६० ॥
'वत्सा, उठीं' वाणी सुधाळ वाहे उंचावुनी मान नृपाळ पाहे
तों सिंह ना, धेनु दिसे समोर स्वमायशी सोडित दुग्ध धार ॥६१॥
त्या विस्मिता, धेनु म्हणे 'कसोटी मी घेतली माव रचून मोठी
ऋषिप्रभावें भय जी यमातें तिसे मला श्वापद काय खातें ! ॥६२॥
तुझ्या दयेनें गुरुभक्तिनेंही प्रसन्न झाल्यें वर माग कांहीं.
वत्सा, नसें केवळ दुग्धदात्री मी तुष्टतां इष्टहि मोजणारी ॥६३॥
जोडूनि हातां प्रभु दानवीर स्वविक्रमें जो पद जोडि 'वीर'
सुवंशकर्तव्य अनंत कीर्ति सुदक्षिणेपोटिं सुपुत्र प्रार्थी ॥६४॥
'तथास्तु' बोलून सुतेच्छु राया पयस्विनी देई तया वरा या
द्रोणांत दोहून सुपुत्रभावें वत्सा ! तुवा दूध मदीय प्यावे ॥ ६५ ॥
सेवूनि वत्सें, गुरुहोमयज्ञें उरेल त्या मी गुरूच्या अनुज्ञे
घेऊन सेवीन तुझ्या दुधानें स्वराज्यषष्ठांश समान, माते ! ॥ ६६ ॥
वाशिष्ठ धेनु स्तविली क्षितीशें त्याच्यासवें होऊनि तुष्ट हर्षें
हिमाद्री कुक्षीमधुनी निघाली श्रमाविणें आश्रमठायिं आली ॥ ६६ ॥
पूर्णेंदुशा राजमुखेंदुतेचें निरोपिले धेनु तयास दे जें
मुद्रेंतलें तें न मुखांत माये सांगे पुन्हां तेंच गुरुस भार्ये ॥ ६८ ॥
तें नंदिनीवत्सहुतावशेष सोत्कंठ प्याला पुसुनी गुरूस
स्तन्यास तो त्या यश शुभ्र भावी कृपाळु राजा विमलस्वभावी॥६९॥
कशी वशिष्ठें व्रतपारणान्तीं प्रस्थान आशीर्वचनें प्रभातीं
नीरोपिल्यांनंतर दंपती ती हो राजधानीप्रति मार्गवर्ती ॥ ७० ॥
हुताशना, दिव्य तशा गुरुस त्याच्याप्रिये, धेनुस नी सवत्स
प्रदक्षिणा घालुन भूप जाय सन्मंगलाचार विलास राय ॥ ७१ ॥
स्वधर्मपत्नीसह तो सहिष्णु विश्राममार्गें जणुं तृप्ततृष्णु
जाई रथांतून मृदु-ध्वनीच्या मनोरथांतूनच कीं स्वताच्या ॥ ७२ ॥
आदर्शनें ज्यास प्रजा तहाने कृशांग जो पुत्रतपोव्रतानें
गमे तिला चंद्र दुजा बिजेचा अतृप्त डोळ्यांनिंच प्यावयाचा ॥७३॥
पुरंदर श्री शिरुनी पुरांत सेवीत पूजा ध्वजतोरणांत
भुजीं भुजंगेंद्रसमान तेजें धुरा धरेची धरुनी विराजे ॥ ७४ ॥

अनुक्रमणिका

घरि उरिं नभ जेवीं अत्रिचे नेत्रतेज
सुरनदि वरि जेवीं वन्हिचें ईश्वरौज
नृपतिकुल विकासी गर्भ राजीव तेवीं
वरगणगुणदीती लोकपालप्रभावी || ७५ ||

• •••

## कोणत्या भाषेंत रडते आहे?



कलकत्त्याला मुस्लिम साहित्य सम्मेलनाच्या महिला शाखेचें वार्षिक अधिवेशन होतें. प्रमुख पाहुणी म्हणून श्रीमती सरोजिनी नायडू हजर होत्या. भाषण करणाऱ्या स्त्रियांपैकीं कुणी शुद्ध बंगालींतून बोलत होत्या तर कुणी अव्वल उर्दूतून. बोलणाऱ्या स्त्रियांपैकीं कुणी बंगालीची तरफदारी करीत होत्या तर कुणी उर्दूची. सरोजिनीदेवी हें सर्व पहात होत्या. इतक्यांत एक स्वयंसेविका लगबगीनें आली व एका तुंदिलतनु 'देवी' ला म्हणाली 'देवीजी आपल्या 'आया'चा फोन आला आहे. आपली छोटी मुलगी सारखी रडते आहे व कांहीं केल्या शांत होत नाहीं.'

बाजूला शांतपणे बसलेल्या सरोजिनीदेवी म्हणाल्या 'त्या आयाला विचार छोकरी उर्दूतून रडते कीं बंगालींतून!'

(पान २३ वरून)

हांहां म्हणतां जवळ आले... हिंदी गाण्याचे सूर सनईतून निघत होते. जमिन हादरेल, अशा आवाजाचे फटाके वाजत होते. मग इकडचेहि ताशे उठले, आणि जवळचें माणूस बोललेलें ऐकायला येणार नाहीं, असा कल्लोळ झाला. लहानशा अंगणात माणसें एकमेकांना आपटत होतीं. जवळच्या घरीं रुखवत झालें, आणि नवरा दारीं यायला निघाला.

—नवरा तोरणांत आला, नारळांचें तोरण धरलें गेलें. गोदीच्या नवऱ्यानें हातांत धरून त्याला पाटावर आणून बसविलें.

—निर्मलेनें त्याला पाटावर बसल्यावर नीट बघितलें...वय जास्त नसावे, व अंगानें चांगला लठ्ठ होता. मिशा झुपकेदार होत्या. डोळे लालसर होते, बघणाऱ्याला पाहिल्यानें भीति वाटावी असे. हाताचें मनगट दणकट होतें, आणि बोटें आखूड होतीं. अघळ पघळ सद्रा त्यानें घातला होता, आणि सबंध अंगातून घाम फुटत असल्यासारखें वाटत होतें.

—अंतर्पट धरला गेला. लांबसुरांत कोणीतरीं मंगलाष्टक म्हटलें... कुणी तरी पुढ्यांत आणून उभें केलें. गोदी थरथरत होती...सारी माणसें उभींच होती. 'आली लग्न घटी' मंगलाष्टक झाले, आणि अंतर्पाट दूर झाला. ताशे एकदम वाजले. बार झाले—गोदीचा हात नवऱ्याच्या गळ्यापर्यंत पोचत नव्हता. कोणीतरी उचलून तिला वर केलें. ओटींतले नारळ बरेंच पुढें आले होते—

—खालीं बसलेल्या नवरानवरीकडे निर्मलेनें बघितलें...गोदीच्या लाल डोळ्याच्या नवऱ्याकडे बघितलें—त्याचे डोळे—त्याच्या झुबक्याच्या मिशा—दणकट मनगट आणि आंखूड बोटें—

—आणि मग तिला स्वतःच्या नवऱ्याची आठवण झाली... खाऊ कीं गिळूं असे त्याचे डोळे—तोंडांत पान ठेऊन खालच्या जबड्यांत झेलीत बोलायची ओंगळवाणी लकब—आणि निर्मलेला वाटलें, आपल्याला भोवळ येते आहे—

• • •












*ज्या सोमरसाचें (विविध स्वरूपांतील) सेवन आज निषिद्ध वा नियंत्रित केलेलें आहे, त्याच सोमाच्या स्तवनार्थ आपल्या शूर पूर्वजांनीं मध्य आशियांतून भारतांत येतांना व आल्यावर जीं कवनें रचिलीं त्याची साक्ष आज ऋग्वेद देत आहे.*



# ऋग्वेदांतील सोम

**— हरिहर अंबेकर**

ऋग्वेद हा अखिल मानववंशाचा जरी नसला तरी आर्यवंशाचा सर्वप्रथम अतिप्राचीन ग्रंथ होय हें मत बहुसंख्य विद्वानांना मान्य आहे. ह्या आद्यवेदांत आपल्याला निरनिराळ्या देवतांची स्तुतिस्तोत्रें सांपडतात. इंद्र, अग्नि, सूर्य, वरुण इत्यादि देवांवर ऋषींनीं सूक्तें रचिलीं आहेत. त्या देवतांत सोम ही एक प्रमुख देवता आहे. प्रमुख म्हणण्याचें कारण म्हणजे, ऋग्वेदांतील एकूण १०२८ सूक्तांपैकीं सर्वांत जास्त, २५० इंद्राला अर्पिलीं आहेत, अग्निला उद्देशून २००, तर त्याचे खालोखाल १२० सूक्तें सोमाचे स्तवनार्थ आहेत. सोमाचे आणखी एक असामान्य वैशिष्ट्य म्हणजे ११४ सूक्तांचे संपूर्ण नवम मंडल हें सोममंडल आहे. सोम ही देवता बहुतेक स्थळीं स्वतंत्र देवता म्हणून कल्पिली आहे, तर कांहीं सूक्तांत मात्र, इंद्र, अग्नि, रुद्र वगैरे देवतांच्या जोडीनें तिचा उल्लेख आढळतो.

ह्या सोम देवतेचे ऋग्वेदांतर्गत खरें स्वरूप कोणतें ? हिलेब्रॅाट या जर्मन पंडिताचे मतें सोम म्हणजे चंद्र होय. पण त्या महापंडिताचे विद्वत्तेबद्दल अत्यंत आदर बाळगूनहि या मताशीं सहमत होणें मला कठीण वाटते. उलट ऋग्वेदांतील सोम म्हणजे सोमवल्ली किंवा सोमरस होय, व चंद्र नव्हे हा सिद्धांत सोमदेवतेची ठळक वैशिष्ट्यें ऋग्वेदाचे आधारें पहिल्यानंतर आपणांस पटेल अशी आशा आहे.

सोम भूवर कोठून आला? तो कोणी आणला? ह्या प्रश्नांचे उत्तर ऋग्वेदाच्या चौथ्या मंडलाच्या २६ व २७ सूक्तांत सांपडतें. वरुणानें सोम स्वर्गांत ठेवला होता. चपलपंखी श्येनानें म्हणजे बहिरीससाण्यानें तो प्रथम स्वर्गातून पृथ्वीवर इंद्रासाठीं आणला. भगीरथानें स्वर्गंगेला भूलोकांवर आणतांना जसें महान प्रयास केले तसाच श्येनालाहि त्रास झाला, कारण सोमाचें प्राप्तीकरितां त्याला शंभर लोहदुर्गांतून पार व्हावें लागलें. प्रॉमीथीयसनें स्वर्गांतून अग्नि धरणीवर आणला या ग्रीक पुराणकथेची ( Myth ) आठवण येथें होणें अपरिहार्य आहे. श्येनानें सोम इहलोकांत आणून मनूच्या स्वाधीन केला. त्यानंतर ती सोमवल्ली ऋग्वेदकालीं मुजावान् पर्वतावर मिळत असे. नद्यांचें कांठावर पाण्याजवळ सोमवल्ली सांपडे. अशारीतीनें सोमाचे द्विविध स्वरूप मानलें जाई. एक अलौकिक तर दुसरें लौकिक. स्वर्गीय स्वरूपांतील सोमदेव अंतरिक्षात किंवा/ स्वर्गांत वसती करतो म्हणूनच त्याला दिवः शिशुः म्हणजे आकाशाचें बाळ म्हणत. तर इहलोकांतील सोम फक्त मुजावान् पर्वतावर नद्यांच्या कांठावर सांपडे. त्याला अंधस् असेंहि म्हणत. नारदानें स्वर्गलोकांतून आणलेला पारिजात घरोघर फुलतो पण दर्जेदार सोम मात्र त्या विशिष्ठ पर्वतावरच आढळत असे. मुजावान् पर्वत हा हल्लींच्या कोणत्या पर्वताचा पर्याय आहे हें निश्चित सांगणें कठीण आहे.

सोमाची उत्पत्ति अलौकिक आहे तसेंच त्याचें स्वरूप बहुरंगी आहे. सोमवल्ली ही अरुण, बभ्रू ( पिंगट ) किंवा हारी ( हिरवट ) रंगाची असे. त्या वल्लीचा देट दगडांच्या उखळींत किंवा चरकांत घालून त्यांचा रस काढीत. तो रस पिवळसर रंगाचा असे. सदर








रस मेंढ्यांच्या लोकरीच्या गाळण्यांतून गाळ-ण्यांत येत असे. गाळण्यांतून तो रस खालीं लाकडी द्रोणांत किंवा चंबूत पाझरत असे. त्यावेळीं सोम वादळाप्रमाणें गर्जना करित असे. नंतर त्या सोमरसांत पाणी, दूध, दहि किंवा मध मिसळत असत. ह्या मिश्रण पदार्थाचें वर्णन सोमदेवतेचें राजवस्त्र म्हणून केलेलें आहे. अशारीतीनें आर्य लोक सोमाला सौन्दर्यानें नटवीत असत. म्हणूनच 'इंदु' म्हणजे चमकदार बिंदु असें एक सोमाचें लाडकें उपनांव आहे. सोमरस गाळण्याचा समारंभ मंत्रोच्चारासहित करीत असत. त्यांत पावित्र्याची व श्रद्धेची भावना असे.

अशा रीतीनें विधियुक्त सोमवल्लीपासून तयार करण्यांत आलेला सोमरस हा देवतांना यज्ञांत अर्पण करीत असत. म्हणूनच सोमाला यज्ञाचा आत्मा (आत्मा यज्ञस्य पूर्व्यः।) म्हटलें आहे. आर्यांची यज्ञाची मध्य-वर्ती कल्पना अशी होती कीं मानवाला देव-तांना आवडणारा हविर्भाग देवतांप्रत यज्ञ-मार्गानें पोहोचवतां येतो. व त्यामुळें देवता संतुष्ट होतात व त्या यजमानाचे मनोरथ पूर्ण करतात. ह्या देवतांना हविंची पार्सलें पोचव-णारा पोष्टमन म्हणजे अग्नि. अग्निज्वाला व धूर वर आकाशाकडे जातात त्यामुळें स्वर्लोकांतील देवतांपर्यंत अग्निचा अनिरुद्ध संचार होतो असें आर्यलोक मानीत. त्या देवतांमध्यें प्रमुख इंद्र ! त्याला सोम फार प्रिय, म्हणूनच कदा-चित् इंद्र, अग्नि व सोम या देवतांनां उद्देशून ऋषींनीं सुरवातीला सांगितल्याप्रमाणें जास्तीत जास्त ऋचा रचल्या असाव्यांत. कारण इंद्र हा हविर्भोक्ता, अग्नि हा हव्यवाहन, तर सोम हा प्रत्यक्ष हवि ! सोमाला स्तुति फार आवडे म्हणून त्याला स्तुतिप्रिय म्हटलें आहे. त्याच कारणासाठीं संपूर्ण नवम मंडल सोमस्तुति सूक्तानीं नटलें आहे. इंद्राप्रमाणें वायु वगैरे देवतानाहि सोमरस खूप आवडे. म्हणूनच सोमयाग हा ऋग्वेदीय यज्ञसंस्थेचा कणा होता असें म्हटलें जातें.

'देवतांना सोम यज्ञमार्गे अर्पण केल्यानंतर यजमान व इतर श्रोत्रीय शेषसोमाचें प्रसाद म्हणून प्राशन करीत. सोम चवीला गोड असे असें त्याचें वर्णन आढळतें. देवांच्या अंतःकरणाला त्यानें आनंद होत असे. सोम प्राशन करणा-र्‍यांना त्याचा उत्तेजक परिणाम होई. सोम शक्तिदायी असे. त्यानें वरेनसे रोग बरे होत अशी समजुत होती. सोमपी अमर होत असे सर्वांची श्रद्धा होती. सोम देवतेला ऋषि आवाहन करतात व तिच्याकडे कीर्ति, वैभव, बुद्धि व संपत्ति दे अशी सश्रद्ध अंतःकरणानें प्रार्थना करतात.

सोमांस वनस्पतींचा पति म्हटलें आहे. कारण सोमवल्ली ही सर्व औषधींत महत्वाची मानली जात असे, कारण तिच्यांत रोग नष्ट करण्याचें सामर्थ्य असे.

अशा या सोमाचें वर्णन करतांना ऋग्वेदीय कवि काव्यमय भराऱ्या मारीत. कवीच्या प्रतिमेला प्रेरणा देण्याचें आकर्षण सोमांत असल्यानेंच त्याला कवींचा राजा म्हटलें असावें. त्याला रसराज म्हटलें आहे. तो अन्नयुक्त आहे. मानवी देहाचा रक्षक असें त्याचें वर्णन आहे. तो शरीरांतील सांध्यात वास करतो. रोगांप्रमाणें शत्रूंचा नाश कर-ण्याचें सामर्थ्यहि त्याच्यांत आहे. सूर्य त्याला पुढें हांकलतो. नवव्या मंडलांत पर्णयुक्त सोमाचा जनक पर्जन्य होय असें वर्णन आढळतें. सोम हा पावसाचा पुत्र असल्यानें त्याची 'तूं पाऊस पाड' अशी प्रार्थना केली असावी. लहान मूल हट्ट करून हात धरून बापाला त्याला हवें त्या ठिकाणीं घेऊन जाऊं शकतें. हा बाल हट्टाचा मानवी अनुभव येथें जमेस धरला असावा. जलांत जसा चंद्र शोभतो तसा लाकडी द्रोणांत सोमराजा चमकतो अशी बहारदार उपमा आपल्यास आढळते.

सोम व इंद्र यांचा संबंध जिव्हाळ्याचा आहे. देवांत इंद्र श्रेष्ठ तर वनस्पतींत सोम श्रेष्ठ. प्रथम श्येनानें स्वर्गातून सोमवल्ली इंद्राचे उपभोगासाठीं आणली. इंद्रास यज्ञांत सोम-रसाची आहुती देत. सोमरस प्राशन करूनच इंद्र लढाईवर जाई व शत्रूंचा निःपात करी. सोमपानामुळें इंद्राचें सामर्थ्य इतकें वाढत असें कीं तो सूर्यासहि उगवायला लावी. इंद्र हा वस्तुतः आर्यांचा पुढारी व महान् योद्धा असावा. त्यानें अनार्यांवर मोठमोठे विजय मिळवले व आर्यांचें आर्यावर्तातील वसतीस्थान निर्वेध केलें असावें असें एक मत आहे. कालांतरानें विभूती पूजेची दैदीप्यमान वलयें त्याचे भोवतीं जमा होऊन तो देवपद पाऊन स्वर्गात विराजमान झाला असावा. इंद्रादि देव सोम-रस अमरत्व मिळवण्यासाठीं प्राशन करीत म्हणूनच सोमाला देवांचें अन्न म्हटलें आहे. इंद्राला सोम फार आवडे म्हणूनच ऋषि म्हणत, 'इंद्राय इन्दुः परिस्रव।' हे सोमा तूं इंद्रासाठीं पाझर !

वरील विवेचनावरून सोम म्हणजे सोमवल्ली किंवा सोमरसच होय असा अर्थ निघतो; चंद्र नव्हे. कारण चंद्राचा उल्लेख ऋग्वेदांत मास किंवा चंद्ररस असा स्पष्ट शब्दांत केलेला दिसून येतो. व्युत्पत्ति शास्त्राचे दृष्टीनें पाहिलें असतां 'सु' धातूचा अर्थ पिळणें असा आहे. अवेस्तामध्यें सोमाला 'हा ओम' असा प्रतिशब्द आहे...तो अवेस्तिक शब्द 'हु' या धातुपासून निघाला आहे. अवेस्तामधें 'हु' म्हणजे पिळणें; व 'हाओम' म्हणजे पिळलेला रस. भारतांत आर्यांचें आगमन होण्यापूर्वी ते इराणमध्यें रहात असत, या कालखंडास इंडो-इरासियन कालखंड म्हण-तात. तेव्हां अवेस्तीक हाओम म्हणजे पिळ-लेला रस असेल तर त्याचा भारतीय इंडो-आर्यन कालखंडातील अवतार सोम म्हणजेहि पिळलेला रस असें मानणें हें अधिक तर्कशुद्ध नव्हे काय ? कारण इंडो-इराणीयन वाङ्मय-यांत हाओम म्हणजे उत्तेजित रस देणारी एक वल्ली असा निश्चित अर्थ मिळतो.

ऋग्वेदाचे पहिल्या मंडळांत एकूण देवांची संख्या ३३ आहे, असा उल्लेख सांपडतो. त्यापैकीं ११ स्वर्गस्थ, ११ अंतरिक्षस्थ, तर ११ भूलोकस्थ देवता आहेत असें वर्णन आहे. ह्या वर्गवारींत सोम ही भूलोकस्थ देवता म्हणून मानली आहे. सोम म्हणजे चंद्र असता तर ती देवता अंतरिक्षस्थ अथवा स्वर्गीय संघांत सांपडायला हवी होती. याच कारणानें ऋग्वेदावरील सायनादि पारंपारिक टीकाकार सोमाला चंद्रस्वरूप मानत नसत.

तेव्हां एवंगुणविशिष्ट सोम म्हणजे सोम-वल्ली किंवा सोमरसच होय. ऋग्वेदोत्तर काळांत मात्र सोम म्हणजे चंद्र असें समीकरण आढ-ळतें. त्या दोघांत समान विशेषणें व उपपदें आहेत. उदाहरणार्थ दोन्ही पर्वतावर जन्मतात, दोन्ही वनस्पतिपति, दोन्ही दिवः शिशुः, इंदु, देवांचें अन्न, दोन्हीमुळें अमरत्व प्राप्त होते ही श्रद्धा आणि दोन्ही कवींचे मुख्य व मनाचे स्वामी !

• • •

अनुक्रमणिका








राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत


दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

अनुक्रमणिका




*हिरामण पोपट, अरब व्यापारी आणि नूरबेगम यापैकीं घाशिराम कोतवालाहून शहाणें कोण ? खालील कथेंत त्याचें उत्तर मिळतें का पहा ! —*

# पोपटाची साक्ष

कोतवाल याला पक्षी पिंजऱ्यांत ठेवून बाळगण्याचा व त्याला शिकविण्याचा फार शोक होता. कोणी परदेशी मनुष्य आला म्हणजे त्याला आपले हिरामण पक्षाची बोलण्याची तारीफ तो सांगत असे. एकवेळ एक अर्बस्तानचा मनुष्य आला होता. त्याला हिरामण कोतवालानें दाखविला. तेव्हां तो पक्षी "रामराम हो दादा रामराम" असे शब्द बोलिला. त्यावरून पक्षी काय बोलत आहे असें त्या आरबानें विचारिलें असतां तुम्हास तो सलाम करीत आहे असें उत्तर कोतवालानें दिलें. त्यानंतर 'क्या खबर है' असें आरबानें मुसलमानी भाषेंत पक्षास विचारिलें तेव्हा पक्षानें कांहींच उत्तर दिलें नाहीं. त्या प्रसंगानें त्यानें देशोदेशच्या पक्षांच्या गोष्टी सांगितल्या.

आगस्तस सिझर या पादशाह मार्क अन्तोनी याजवर मोहिम करून व तींत जय पावून मोठ्या समारंभानें रोम शहरांत येत होता. तेव्हा पुष्कळ लोक सामोरे आले होते. त्यांत एक मनुष्य मैना हातावर बसवून आला होता. त्याचेजवळ पादशाहाची स्वारी येतांच मैना आपले पंख फडफडावून बोलली. विजयी पादशाह सीझर याजला ईश्वर सलामत राखो. हें ऐकून पादशाह परमानंद पावला आणि त्या मनुष्यास पुष्कळ पैसा देऊन त्यानें ती मैना घेतली. पुढें मैनेचे मालकानें बक्षिसापैकीं आपले सोबत्याला देऊं केलेला अंश दिला नाहीं त्यावरून त्या सोबत्यास राग येऊन त्याचा सूड उगवावा असा त्यानें निश्चय केला. मग ज्यास बक्षीस मिळालें होतें त्याचे मनांत खरी राजभक्ति कांहींच नाहीं, केवळ पोट भरण्याकरितां एका पक्ष्यास मात्र राजस्तुतीचे शब्द शिकवून टेविले होते, पण दुसरे पक्षास त्यानें विपरित शब्द शिकविले आहेत, असें दाखविण्यासाठीं दुसरी मैना तो सोबती सीझर पादशाहाचे सभेंत घेऊन गेला आणि सरकारानीं ज्यास इनाम दिलें त्या मनुष्यानें दुसरी एक मैना तयार करून नजर पाठविली आहे ही पहावी, इतकें तो बोलत आहे तों ती दुसरी मैना म्हणाली, 'विजयी मार्क अंतोनी यास ईश्वर राखो.' हें ऐकून सीझर पादशाह जो मोठा शहाणा होता तो हांसला आणि पहिले दिलेले इनाम दोघानीं निमेनिम वाटून घ्यावें अशी त्याने आज्ञा केली.

एक चांभार फार दरिद्यांत होता. त्याने इनाम मिळविण्याचे आशेने एक पक्षी आणून त्याला शिकविण्याची मेहेनत घेतली. परंतु तो लवकर शिकेना; हे पाहून निराश होऊन त्या पक्ष्यापाशीं उभा राहून त्याने वारंवार म्हणावे 'बरें तर माझे श्रम व्यर्थ गेले.' पुढें आणखी श्रम घेऊन त्या पक्ष्यास सीझर पादशाहाकडेस नेलें. तेव्हां 'पादशाहाला ईश्वर रक्षो' असे शब्द स्पष्ट रीतीनें तो पक्षी बोलिला. त्यावरून पादशाह बोलिले, 'छे तुजसारिखे आर्जवी मजपाशीं पुष्कळ आहेत.' त्यावर तो पक्षी 'बरें तर माझे श्रम व्यर्थ गेले.' असे शिकविणारापासून ऐकिलेले शब्द बोलिला. तें समर्पक उत्तर ऐकून शिकविणाराचे उमेदीपेक्षां जास्ती किंमत त्याला देऊन पादशाहानें तो पक्षी विकत घेतला.

एका सौदागरानें पोपटास 'यांत काय संशय' असे शब्द शिकवून बाजारांत विकण्यास नेलें. तेथें एका गृहस्थानें येऊन त्याची किंमत विचारिली. तेव्हां पांच मोहरा किंमत आहे असें सौदागरानें सांगितलें. तेव्हां गृहस्थ म्हणाला, 'पोपटांची इतकी योग्यता आहे कीं काय?' तेव्हां, पोपटास पुसा म्हणजे कळेल असें सौदागरानें उत्तर दिलें. त्यावरून 'कायरे पोपटा, पांच मोहरांची तुझी योग्यता आहे काय?' असे गिऱ्हाईकानें विचारिलें असतां 'यांत काय संशय?' असें पोपटानें उत्तर दिलें. त्यावरून पांच मोहरा देऊन या गृहस्थानें पोपट घेऊन घरीं नेला आणि त्याशीं तो बोलूं लागला. तों 'यांत काय संशय' इतके शब्द मात्र पोपट म्हणे. तें पाहून मी मूर्खपणाने इतका पैका ह्या पोपटाकरतां दिला असें भाषण त्रासाने त्याच्या तोंडावाटे आलें. ते ऐकून 'यांत काय संशय' असें पोपटाचें उत्तर आलें. तें ऐकून तो हांसला आणि पोपटास त्याने पिंजऱ्यांतून काढून सोडून दिलें. ह्याप्रमाणे प्रसंगवशात समयोचित दिसणारें भाषण बोलण्यास पुष्कळ पक्षी शिकतात. त्याप्रमाणे देखील तुमचा हिरामण तयार झाला नाहीं. मर्जी असल्यास मी तयार करितों, असे तो आरब सौदागर बोलिला.

हें बोलणें घाशिरामनें त्या आरबास दरमहा ठरवून हिरामण शिकविण्यास त्याचे स्वाधीन केला. त्याला पांच सहा महिने शिकवून आरबानें परत आणिलें, आणि मी फार श्रम घेऊन ह्या पक्ष्यास पढविलें आहे म्हणून तो बोलिला. त्यावरून "तुला पढविण्यास श्रम पडले काय रे हिरामण?" असें कोतवालानें विचारलें. तेव्हां 'होय खरी गोष्ट आहे' असें त्या पाखरानें उत्तर दिलें. तें ऐकून माझा पोपट शहाणा झाला असें समजून, अरबास एक चांगला चंदेरी शेला देऊन कोतवालानें निरोप दिला. मग संध्याकाळीं नाना फडणवीस यांचे वाड्यांत कोतवाल गेले, तेव्हां आपले हिरामण पक्ष्याची भर सभेंत अशी तारीफ






केली की त्या पोपटास कोणताहि प्रश्न केला असतां त्याचें समर्पक उत्तर तो देतो. त्यावरून तुमचा पोपट एक दिवस दाखवा असें नाना फडणवीस बोलले.

नंतर तिसरे दिवशीं पोपटास शिकविणाऱ्या अरबाचे राखेनें संगमावर जाऊन रेसिडेंट साहेबाशीं अर्ज केला कीं, मी इंग्रज सरकारची रयत होऊन नुकतीच येथें आलें आहे. मजवर शहरचे कोतवालानें मोठा जुलूम केला आहे.तो असा कीं, माझा नवरा हिंदुस्थानात गेला आहे व मी घरीं मोलमजुरी करून पोट भरीत असतें. मी एकटी असतें हें पाहून कोतवाल यानी मजवर कांहीं दिवसांपासून वांकडी नजर ठेवली आहे. मला पाचचार वेळां बोलावणें पाठविलें, पण मी त्यांकडेस गेलें नाहीं. त्यानंतर एक दिवशीं माझे घरांत अंधारांत ते शिरले आणि मजवर जबरी करूं लागले; ते समयीं मी बोंब मारल्यावरून ते निघून गेले. जातेवेळेस बरें रांडे, तुझी खबर घेतों, तुझसारख्या रांडा मी फार पाहिल्या आहेत. असें मोठ्या रागानें बोललें. दुसरें दिवशीं प्रातःकाळीं मीं पाणी आणण्यास हवदावर जात असतां एक मनुष्य माझे पाठीमागून येऊन बावनखणी कोणीकडेस आहे असें विचारूं लागला; तेव्हां शुक्रवारांत कोतवाल चावडीचें नजीक ती आहे असें मी उत्तर दिलें. तेथें कोणाची किती वस्ती आहे. असें त्यानें पुन्हां पुसल्यावरून पांचपन्नास कसबीणी तेथें राहतात असें ऐकितें इतका मी जाब देतें तों एक शिपाई येऊन मला व त्या मनुष्यास धरून कोतवालाकडेस घेऊन गेला. तेथे कोतवाल हे रागें भरून त्या मनुष्यास तूं काय करीत होतास म्हणून विचारूं लागले. तेव्हां माझी व या बाईची फार दोस्ती आहे व तिचें घरीं मी जात असतो सबब आज केव्हां येऊं असें विचारीत होतों; ही बोलली कीं एकदोन दिवसांनी माझा नवरा हिंदुस्थानांतून येणार आहे, यास्तव आतां निजण्यास येऊं नको, याप्रमाणें त्या लुच्चयानें सर्व बनावटी मजकूर सांगितला. तेव्हां फौजदारी कारकून याला कोतवालानें सांगितलें कीं ह्या मनुष्याचा हजर जामीन घेऊन याला चार दिवसांनी हजर ठेवायचा बंदोबस्त ठेवावा व ह्या रांडेस आपले पक्षी आहेत त्या कोठडींत कोंडून ठेवा. त्याजवरून मला त्या कोठडींत कोंडून ठेविलें व बाहेरून दार बंद केले. नंतर कांहीं वेळानें आंतील दार उघडून कोतवाल त्या कोठडींत आले आणि मला अंतर्गृहांत नेऊन तेथें चारपांच रांजण उघडून हसत हसत म्हणाले, कीं शहरांतील लबाड रांडाच्या घेतलेल्या ह्या नथा आहेत. त्यांत हजार पांचशें रुपयांचे किंमतीच्याहि नथा आहेत. त्यास तुझे पसंतीस येईल ती नथ तूं त्यांतून घे. तेव्हां मला नथ नको व कांहीं नको, तुमचे पांया पडतें मला सोडवा असें मी बोलिलें. तें न ऐकतां, आतां फार बोललीस तर ह्या तरवारीनें तुझें डोकें उडवून येथेंच तुला पुरून टाकीन, असें क्रोधानें बोलून मला झोंबून माझा उपमर्द केला. तेथें कोणी पहाण्यास नव्हतें. एक मोठा हिरवा पोपट पितळेच्या पिंजऱ्यांत होता. त्याला बोलतां येत असतें तर तो माझा साक्षीदार झाला असतां. याप्रमाणें माझी हरमत घेतल्यानंतर हा चंदेरी शेला मला देऊन त्यांनीं सोडून दिलें. फडणिसांकडे जावें तर कोतावाल त्यांचे मीतींतील; तेव्हां माझी दाद कशी लागते ? आतां माझीवाळीवर खुदाव साहेब येथें माझा नवरा आल्यानंतर मला टाकून देईल आणि माझी शुद्धी होण्यास दोन हजारपर्यंत खर्च लागेल, ह्याप्रमाणें बोलून डोळयांत अश्रू आणून साहेबांपुढें पडली. तेव्हां तुझा इनसाफ होईल. भिऊं नको. असें सांगून रेसिडेंट साहेबानीं तिचें नांव विचारिलें असतां बेनुर बेगम बंगाली असें तिनें सांगितलें. त्यावरून तिची सर्व हकीकत टिपून घेऊन तिची याद फडणिसांकडेस साहेबांनीं पाठविली, व ती सोबत नुरबेगम इलाहि रवाना केलें व तिजविषयीं कसा काय उलगडा केला तें उत्तरीं कळविण्यांत यावें म्हणून लिहिलें. ती याद फडणीसांचें हातीं गेल्यावर त्यांनीं कोतवालास बोलावून आणून त्याला ती दाखविली. कोतवालानें पाहून सर्व मजकूर खोटा आहे असें सांगितले. त्यावरून तुमचें घरीं हिरामण पोपट किती आहेत असें फडणिसांनीं विचारिलें. तेव्हां आपल्यास कालचें दिवशीं ज्याची तारीफ सांगितली तो एकच आहे, असें घाशिराम बोलिले. नंतर पोपटाचा पिंजरा आणावा म्हणून फडणिसांनीं सांगितलें त्यावरून हिरामण पोपट आणविला. तेव्हां तुम्हीं मध्यें कांहीं बोलूं नका असें घाशीरामाला सागून हिरामण जवळ आणवून नूरबेगमेकडेस बोट दाखवून ‘ ही गोष्ट सागतें ती खरीं आहे काय ? ’ असें त्या पक्ष्यास फडणिसांनीं विचारिलें असतां ‘ होय खरी आहे, होय खरीं आहे ’ असें तो बोलिला. तेव्हा सर्व हंसून कोतवालाकडेस पाहूं लागले. त्यावरून कोतवालास राग येऊन ह्या पोपटास लुच्चयानीं फितविलें आहे असे म्हणून हातांत काठी होती ती त्यानें जोरानें हिरामणाचें मानेवर मारली. तेणेंकरून तो दांडीवरून खालीं पडून तडफडून तत्क्षणी मेला. तेव्हां फडणिसांस व सर्व लोकांस नूर बेगमची फिर्याद खरी वाटली, पोपटांस आणखी विचारावें तर तो मेला. नंतर घाशीरामास नूरबेगमची समजूत करावी लागली. ● ● ●

तिघेहि अट्टल गुन्हेगार म्हणून
प्रसिद्ध होते. खिडकीचे गज वांकवून तुरुंगांतून
ते निसटले होते. तिघांनींहि निरनिराळे गुन्हे केले होते.
जेलमधून बाहेर पडतांच तिघांनींहि आपलीं डोकीं एक केलीं
आणि शिताफीनें ते डल्ला मारूं लागले;
—पण आपली हिकमत ते पचवूं शकले का ?.......



केन्सासमधील हचीसन शहर चांगलं ऐसपैस आहे. त्या शहरांत सुईपासून पाळण्यापर्यंत सगळ्या वस्तु मिळूं शकतील असं एक मोठं विकान होतं. विकानाचा मॅनेजर म्हणून कार्ल रीच हा काम पाहात होता. व्यवस्थित काम करायचें व संध्याकाळीं आपल्या 'पॉन्टॅक' गाडींतून घरीं जायचें हा त्याचा कित्येक वर्षांचा क्रम होता. घरीं जाऊन मग आरामांत तो वर्तमानपत्र वाचीत बसे.

२ मार्च १९६१ ची संध्याकाळ उजाडली आणि रीच नेहमी-प्रमाणें घरीं गेला व वर्तमानपत्र वाचीत बसला होता. त्याची बायको स्वयंपाक करण्यांत गुंतली होती. त्याची दोन मुलं दूरध्वनीयंत्रावर कुठलातरी कार्यक्रम पाहण्यांत दंग झालीं होतीं. इतक्यांत दरवाजावर 'टक् टक्' ऐकूं आली. लगबगीनें एका मुलानें दार उघडलें. तें उघडतांच त्या लहानग्या मुलाला लाथाडून तीन शस्त्रधारी इसम आंत घाले!

त्यांतील एकानें आपली पिस्तुल रीचवर रोखली व कर्कश आवाजांत तो म्हणाला, 'मुकाट्यानें तुझ्या विकानाची किल्ली माझ्या हवाली कर!' दुसऱ्या एका माणसानें पोरांचा ताबा घेतला तर तिसरा स्वयंपाकघरांत जाऊन रीचबाईंना दरडावून म्हणाला, 'आरडा-ओरडा करूं नका. शांतपणें बाहेरच्या दिवाणखान्यांत बसा. जर कांहं गडबड केलीत तर तुमचा प्राण घेईन मी.' रीचबाई मुकाट्यानें दिवाणखान्यांत बसल्यावर, त्या तिघांनीं दिवाणखान्याचं 'निरीक्षण' केलं. एका टेबलाच्या खणांत त्यांना २७०० रुपये सांपडले. ते त्यांनीं सरळ खिशांत टाकले.

इकडे पहिल्या मारेकऱ्यानें रीचच्या खिशांत हात घालून सरळ विकानाची किल्ली हस्तगत केली व तो झटक्यांत बाहेर पडला. मग उरलेल्या दोघांनीं रीच दांपत्याला त्यांच्या दोन मुलांचें हातपाय वायरनें बांधायला लावलें. नंतर एकानें रीचचे हात त्याच्या पाठीला बांधले व दुसऱ्यानें रीचबाईंना एका खुर्चीशीं जखडून टाकलें.

ह्या 'धडपडी'त ३० मिनिटें निघून गेलीं!

मग त्यांचा तिसरा सहकारी नोटांचीं बंडलं घेऊन आला. त्यानंतर ते तिघे हळूंच घराबाहेर पडले. बाहेर आल्यावर रीचच्या 'पॉन्टॅक' गाडींत ते बसले व पसार झाले!

हे तीन शस्त्रधारी इसम कोण होते?

ते तिघेहि अट्टल गुन्हेगार म्हणून प्रसिद्ध होते. कॅलीफोर्नियांतील 'सॅन लुईस' ह्या तुरुंगांतून ते पळून आले होते. खिडकीचे गज वांकवून त्यांनीं हा पराक्रम केला होता! ते तिघंहि निरनिराळे गुन्हे

करून तुरुंगांत आले होते. तिघांनीं मग आपली डोकीं एक केलीं व ही पळून जाण्याची शक्कल काढली ! तिघांचा जो प्रमुख होता त्याचं नांव होतं–डग्लस थॉम्पसन. त्याचं वय २७ होतं. दुसऱ्याचं नांव सॅम्युअल टकर असं होतं व तो २६ वर्षांचा होता. २२ वर्षांच्या तिसऱ्या इसमाचं नांव काल्व्हीन जॉन्सन असं होतं.

जेलमधून बाहेर पडतांच त्या तिघांनीं मोठ्या शिताफीनें एक लॉरी हिसकावून घेतली व तींत बसून ते सरळ 'बेकर्सफील्ड'कडे निघाले. वाटेंत एका दारूच्या गुत्यांत ते शिरले. यथेच्छ दारू प्यायले व वर दुकानांतल्या २,२५० रुपयांवर डल्ला मारला. नंतर ते योगायोगानें 'हचीसन' ह्या शहरीं थांबले व योगायोगानेंच कार्ल रीचचं मोठं विकान त्यांनीं पाहिलं; आणि 'ह्यालाच लुटूं या !' असं त्यांनीं ठरविलं. नंतर रीचच्या सगळ्या हालचाली त्यांनीं लक्षपूर्वक न्याहाळल्या, व मग 'हिंमत' चालवली.

'पॉन्टॅक' गाडी दूरवर गेल्याची खात्री झाल्यावर चपळाई करून रीचबाईंनीं आपली सुटका करून घेतली. मग त्यांनीं नवऱ्याला व मुलाला मोकळं केलं, नंतर त्या ताबडतोब शेजारी गेल्या व फोन करून पोलिसांना सगळी हकीगत कळवली.

१५ मिनिटाच्या आंत धांपा टाकीत पोलिस येऊन थबकले. सगळी हकीगत कळतांच चारीहि दिशा रोखून धरण्यांत याव्यात म्हणून आदेश देण्यांत आले.

रीचनें केलेल्या मारेकऱ्यांच्या वर्णनानुसार चित्रकारानें त्यांचीं चित्रं काढलीं. ती प्रमुख पोलिस चौकींत पाठविण्यांत आलीं. त्याचप्रमाणें वर्तमानपत्रांतहि तीं चित्रं झळकलीं.

दुसऱ्या दिवशीं म्हणजे शनिवारीं दुपारी दोन वाजतां रीचची 'पॉन्टॅक' गाडी पांचसहा घरं सोडून एका घरामागें पडलेली मिळाली. ह्लेखोरांनीं आपल्या अंगावर जे लष्करी कपडे घातले होते तेही त्या मोटारींतच मिळाले पण फाटक्या स्थितींत ! मोटारीच्या पुढील गादीवर विकानाची किल्लीहि पडली होती. सगळ्या खाणाखुणा होत्या. पण ते तिघे आतां कुठें असतील ह्याच्या खुणा पोलिसांना कसून शोध करूनहि मिळाल्या नाहींत.

जवळ जवळ आठवडाभर पोलीस जारीनें तपास करीत होते आणि ९ मार्च रोजीं पहिला दुवा सांपडला ! तो हा कीं वर्तमानपत्रांतील फोटोवरून 'सॅन लुईस' तुरुंगाच्या अधिकाऱ्यानें लगेच पोलिसांना कळविलें कीं आपल्या तुरुंगांतून जे तीन गुन्हेगार पळून गेले तेच हे होत. त्यानें मग त्यांचीं समग्र नांवें पोलिसांना दिलीं. त्यांना ताबडतोब पकडण्यासाठी वॉरंट काढण्यांत आलं पण आतां त्यांना शोधायचं कुठें ?

१० मार्चला धागेदोरे जुळूं लागले ! हचीसनपासून ६०० मैल दूर निसुरी आहे. तेथें 'क्रॉगर सुपरमार्केट' प्रसिद्ध आहे. त्या भव्य विकानावर त्या दिवशीं दोन माणसें पाळत ठेवीत होतीं पण विकानाच्या मालकाच्या लक्षांत हे आलं व त्यानें त्या दोन माणसांना तंबी दिली– 'इथून चालते व्हा ताबडतोब नाहींतर मीं पोलीसांना खबर देईन.' तीं दोन माणसं म्हणजे दुसरें तिसरें कोणी नसून काल जॉन्सन व डग थॉम्पसन होते. तंबी मिळाल्यावर ते दोघेहि तेथून सटकले. जॉन्सन U. S. Highway 61 ला निघून गेला तर डग जवळच्या पेट्रोलपंपावर गेला ! परंतु विकान बंद झाल्यावर हीं माणसें परतहुद्दां येतील ह्या भीतीनें त्या दोन माणसांच्या संशयीत हालचालीबाबत तो पोलिसांनां कळवून मोकळा झाला !

पोलिस-स्टेशनवर त्यावेळीं पोलिस-अधिकारी डोनाल्ड क्रिटेन्डन व मदतनीस-अधिकारी हर्बट गॅास हे होते. डोनाल्ड हा अवघा २२ वर्षांचा तरुण होता व त्याच दिवशीं रात्रीं ११ वाजतां तो पोलिसखात्यांतील नोकरीला रामराम ठोकणार होता एका फर्ममध्यें त्याला नोकरी मिळाली होती; तर गॉस हा ६७ वर्षांचा वृद्ध होता. म्हातारपणीं कांहींतरी उद्योग पाहिजे म्हणून तो हौसेने पोलिस खात्यांत 'मदतनीसाचं काम पाहत होता !

विकानाच्या मालकाचा फोन आल्यावर दोघेहि विकानांत हजर झाले. विकान बंद करून मालक त्यांची वाट पाहतच होता. त्यांनीं त्याच्याजवळ समग्र चौकशी केली. अधिक विचारपूस करतांच शेजारचा एक दुकानदार म्हणाला कीं, 'थोड्याच वेळापूर्वीं आपण दोघां इसमांना ५६ सालचं मॉडेल असलेल्या 'ओल्डसमोबाईल'मोटारींतून जातांना पाहिलें. ती मोटार U. S. Highway, 61. कडे गेली !'

ही माहिती स्फोटक ठरली ! 'ओल्डसमोबाईल'चा पाठलाग करण्यासाठीं वर्दी देण्यांत आली. स्वतः क्रिटेन्डन व गॉस एका जीपमध्यें बसून पाठलाग करण्यासाठीं निघाले. क्रिटेन्डन जीप चालवीत होता. दुसरा एक अधिकारी–रॉस व एक मदतनीस हे पण दुसऱ्याएका मोटारींतून त्यांच्याबरोबर निघाले. सुमारें अर्धा मैल गेल्यावर रस्त्याच्या टोंकाला एक ओल्डसमोबाईल उभी असल्याची त्यांना दिसली. 'हीच आपली शिकार' हें त्यांनीं लगेच ओळखलं. रॉस व तो मदतनीस जवळच्या पेट्रोल पंपाजवळ थांबले तर क्रिटेन्डननें आपली जीप त्या मोटारींच्या उजव्या बाजूला नेऊन थांबविली. गॉस लगेच मोटारीच्या दुसऱ्या बाजूला गेला. क्रिटेन्डननें ड्रायव्हरला टणकावून विचारलें 'तुझें 'लायसन्स' दाखव !'

आणि एकाएकीं स्फोट व्हावा तसा कानठळ्या बसवणारा आवाज झाला ! क्रिटेन्डनवर अकस्मात् गोळ्यांचा वर्षाव झाला. धाडकन् तो खालीं पडला .पण पडतां पडतां त्यानें आपल्या पिस्तुलांतूनहि एक गोळी सोडली. ती मोटारीच्या पुढील काचेवर बसून ती कांच फुटली व तिचें तुकडे त्या ड्रायव्हरच्या चेहऱ्यावर उडाले त्याचा चेहरा रक्तबंबाळ झाला. इकडे दुसऱ्या बाजूला उभ्या असलेल्या म्हाताऱ्या गॉसवर गोळ्या झाडण्यांत आल्या होत्या. म्हातारा चक्क किंचाळला, 'मी मेलों, कोणीतरी गोळी मारली मला !' आणि तो खालीं कोसळला. हा सर्व प्रकार विजेच्या चपळाईनें घडला. झटक्यांत ती ओल्डस् पुढें निघूनहि गेली.

पेट्रोलपंपाजवळ उभ्या असलेल्या रॉसने हा गोळीबाराचा आवाज ऐकला व त्यानें ताबडतोब आपली मोटार चालू केली. त्याच्या बरोबरच्या अधिकाऱ्यानें हवेंत गोळीबार सुरू केला. कांहीं क्षणांत 'समर प्रसंग' घडलेल्या ठिकाणीं ते आले. ती 'ओल्डस्' दूरवर वेगांत पळत असलेली त्यांना दिसली. त्यांनीं ताबडतोब तिचा पाठलाग सुरू केला. त्या अधिकाऱ्यानें आतां 'ओल्डस्'वर गोळ्या झाडायला सुरुवात केली. पण त्या 'ओल्डस्'मधील दुसऱ्या एका










माणसानें उलट त्यांच्या मोटारीवर गोळीबार सुरू केला. त्याची नेमबाजी अचूक ठरली. कारण 'रॉस'च्या मोटारीचीं चाकं नादुरुस्त झालीं. 'ओल्डस्' झोकांत पुढें निघून गेली. रॉस व तो अधिकारी हताश होऊन पुन्हा 'समर प्रसंगी' परतले. तेथें जाऊन पाहतात तों काय ? म्हातारा गॉस मरून पडला होता. क्रिटेन्डन विव्हळत होता. रॉसला पाहतांच तो क्षीण स्वरांत बडबडला. 'मला हॉस्पिटलांत न्या तावडतोब, नाहींतर मीं मरेन !' तावडतोब शुश्रुषापथकगाडी मागवून त्याला मिसूरीच्या हॉस्पिटलांत हलविण्यांत आलं. त्वरेनें त्याच्यावर शस्त्रक्रिया करण्यांत आली. 'तो जगेल' असं डॉक्टरांना वाटत होतं.

रॉसनें बिनतारी यंत्रानें पुढील शहरीं त्या 'ओल्डस्'बद्दल सगळी हकीगत कळवली होती.

खरा पाठलाग सुरूं झाला तो आतां !

आतां वायुवेगानें आपला पाठलाग होईल हे त्या 'ओल्डस्'-मधल्या दोन मारेकऱ्यांनाहि कळून चुकलं होतं. 'ओल्डस्'मधील ते दोन मारेकरी म्हणजे टकर व थॉम्पसन् होते. टकर मोटार हांकीत होता. आपली गाडी सगळ्यांनीं बघितली आहे व तीच बदलली पाहिजे. असं त्यांनीं ठरविलं व म्हणून त्यांनीं एक शक्कल लढवली. ती अशी. कांहीं अंतर गेल्यावर रस्त्याच्या एका बाजुला एक 'शेवरलेट' गाडी उभी असलेली त्यांना दिसलीं. त्यांत तीन कॉलेजयुवक होते. त्यांनीं आपली 'ओल्डस्' त्यांच्याजवळ उभी केली. पटकन् दोघे खालीं उतरले. टकरनें मोटारीचा ताबा घेतला. व थॉम्पसन्नें आपलें पिस्तुल त्या तिघांवर रोखलें. तो त्यांना म्हणाला, 'लवकर खालीं उतरा. आम्हांला ही मोटार पाहिजे आहे' थॉम्पसनचा रागानें लालबुंद झालेला चेहरा व टकरचा रक्तबंबाळ चेहरा पाहून 'हा मामला कांहीं वेगळा आहे' हे त्यांच्या तावडतोब लक्षांत आलं. त्यांनीं मुकाट्यानें आपली 'शेवरलेट' त्यांच्या स्वाधीन केली. 'शेवरलेट' वेगांत निघून गेली. शेजारीं 'ओल्डस्' उभी होती !

इतक्यांत त्या ठिकाणीं पाठलागावर निघालेली पोलिसांची मोटार येऊन थडकली. 'ओल्डस्' पाहून त्यांनीं आपली मोटार थांबवली होती. त्यांच्या चेहऱ्यावर आनंद दिसत होता. पण संशयित चेहरे त्यांना कुठेंच दिसेनांत. कॉलेजकुमारांनीं त्यांना सगळी हकीगत सांगितली व 'आमची 'शेवरलेट' आणून द्या आम्हाला' म्हणून सांगितलें !

तावडतोब मारेकऱ्यांच्या ह्या नवीन हालचालीबाबत पोलिसांनीं सगळीकडे कळविलें व आतां 'शेवरलेट' चा पाठलाग सुरु झाला !

Highway 38 ह्या रस्त्याकडे भरवेगांत निघून गेलेली एक 'शेवरलेट' कांहीं लोकांनी बघितली. पोलिसांनीं आपली मोटार त्या रस्त्याकडे पळविली. त्यांनीं 'शेवरलेट' ला गाठलंहि पण 'शेवरलेट'-मध्यें बसलेल्या मारेकऱ्यानें अचूक नेमबाजी करून त्यांची मोटार नादुरुस्त करून टाकली. पोलिसांनीं बिनतारी यंत्रानें संदेश पाठविले. तोंपर्यंत ती 'शेवरलेट' पुढेंहि निघून गेली.

चारिहि दिशांनीं आपला आतां पाठलाग होईल हे टकर व थॉम्पसन ह्यांनी ओळखलें. त्यांनी आपली 'शेवरलेट' एका जंगलांत वळविली. तेथें ती थांबवून जवळच असलेल्या एका धनाढ्य शेत-



अनुक्रमणिका

कऱ्याच्या बंगल्यावर ते गेले. त्या दोघांना पाहून म्हाताऱ्या शेतकऱ्याची भीतीनें गाळण उडाली. हे पाहून थॉम्पसन म्हणाला, 'भिऊं नकोस आम्ही तुला मारायला आलों नाहीं. फक्त तुझी 'फोर्ड' गाडी आम्हाला दे' शेतकरी वादविवाद करूं लागला तशी त्याची बायको त्याला म्हणाली, 'देऊन टाका ना त्यांना गाडी. नाहींतर आपल्याला मारतील ते!' थॉम्पसन आतां उतावीळ झाला. होता. पोलिस कधीं आपल्याला घेरतील ह्याचा नेम नव्हता. एक-एक क्षण मोलाचा होता. तो शेतकऱ्यावर ओरडला, 'नाहीं देत?' म्हाताऱ्यानें थरथरत्या हातानें मोटारीची किल्ली दिली. ती घेऊन टकर व थॉम्पसन बाहेर आले आणि त्यांनीं 'फोर्ड' चालू केली. पण थोडेच अंतर कापल्यावर त्यांना कळलं कीं, म्हाताऱ्याची फोर्ड अगदीं खटारा आहे! आपला कधीं घात करील ह्याचा नेम नाहीं, म्हणून त्यांनीं तो खटारा तेथेंच टाकला व मागें फिरून 'शेवरलेट'मध्यें पुन्हां बसून ते निघून गेले.

आतां एव्हांना मध्यरात्र झाली होती! पोलिस त्यांना शोधत होते, ते पोलिसांपासून दूर दूर पळत होते. दूरवर गेल्यावर त्यांना एक जंगली वसाहत लागली. पुढें रस्ताहि खराब होता, म्हणून त्यांनीं 'शेवरलेट' तेथेंच टाकली व ते पायी निघाले. पायाला झालेल्या जखमेमुळें सॅम टकर लंगडत चालत होता. थॉम्पसन त्याला आधार देत होता. तशा अवस्थेंतहि त्या जंगलपट्टींतून ते तीन मैल चालून गेले. मग मात्र टकरला पाऊल उचलेना इतका तो वेदनांनीं विव्हळत होता.

जंगलांतीलच एका झाडाखालीं टकर झोपला. थॉम्पसननें त्याच्या अंगावर पालापाचोळा घातला व त्याचं शरीर झांकून टाकलं. त्याच्याजवळचं पिस्तुल थॉम्पसननें स्वतःजवळ घेतलं व त्या जंगलांतून तो एकटाच पुढें निघाला. टकरबाबत त्यानें आतां आशा सोडली होती. 'तुझ्या दैवांत जें असेल तें होईल' अशी टकरबद्दल त्याची भावना होती.

सकाळ होतांच चारीहि बाजूनें जोमानें पाठलाग सुरूं झाला! त्या जंगलापर्यंत पोलिस येऊन पोहोंचले त्यांना 'शेवरलेट' दिसली. 'अल्सेशियन' कुत्र्यानें पोलिसांना बरोबर टकर झोपला होता तेथें आणलें. हताश स्थितींत टकर पोलिसांच्या स्वाधीन झाला. त्याच्या खिशांत पोलिसांना २५६० रुपये मिळाले व 'शेवरलेट'मध्यें ३००० रुपये मिळाले.

पण काळ्हीन जॅान्सन ह्या तिसऱ्या फरारी मारेकऱ्याचं काय झालं होतं? तो कुठें होता? त्यानें आणखीं किवीजणांचें खून केले? तो टकर व थॉम्पसन ह्यांना गांठू शकला नाहीं, म्हणून त्यानें मिसुरीलाच रात्र काढली. सकाळ होतांच एका मोटारविक्रयाला त्यानं गाठलं व त्याच्याकडून २५०० रुपयांना एक मोटार विकत घेतली मात्र ह्या पैशांत एक 'टायर' त्या विक्रेत्यानें पुरवायचं असं ठरलं त्याच्याजवळ 'टायर' नसल्यामुळें तो ते आणायला गांवांत गेला आणि इथें सगळं फसलं! गांवांत गेल्यावर तीन फरारी मारेकऱ्याबाबत त्याला समजलं. तिघांचेहि फोटो पाहून, एकाचा फोटो पहात म्हणाला, 'अहो हा तर माझ्या विकानांत आहे!' पोलिस ताबडतोब त्याच्या दिकानांत गेले. 'टायरची' ची वाट पहात बसलेल्या जॉनसनला त्यांनीं बेड्या घातल्या. आपल्या मूर्खपणाबद्दल जॉन्सनने स्वतःला लाख शिव्या मोजल्या. आपण एक चूक केली, ती आपल्यांला भोवली हें समजून तो मनांतल्या मनांत खजील झाला!

पोलिसांच्या स्वाधीन झालेल्या टकरनें पोलिसांना सगळी माहिती सांगितली. त्यामुळें थॉम्पसनचा पाठलाग करायला पोलिसांना सोपं झालं. पण थॉम्पसन सहजा सहजीं पोलिसांना मिळणार नव्हता. तो जॉनसनसारखा 'मामा' नव्हता! थॉम्पसनबाबतचं वर्णन आतां पाठ झालं होतं.—सहा फूट उंच, भुरकट केस, वजन १६० पौंड, डाव्या हाताचा अंगठा गेलेला, व फिकटरंगाचे कपडें घातलेला!

२५० पोलिस-अधिकारी थॉम्पसनला पकडायला निघाले. सगळे रस्ते, सगळ्या चोरवाटा आतां रोखून घरण्यांत आल्या होत्या. 'कोणी ह्या माणसाला बघितला का! म्हणून चौकशी करण्यांत आली. एक शेतकरी पुढें झाला व म्हणाला, अहो माझ्या घरांतून अंडी चोरीला गेली' दुसरी एक बाई म्हणाली, 'हातांत पिस्तुल घेतलेल्या एका माणसाला मी बघितला पण तो झटकन् समोरच्या बंगल्यांत निघून गेला.' एक शिक्षक म्हणाला, 'मी गोळीबाराचा आवाज ऐकला!' ह्या सर्व थॉम्पसच्या 'लीला' आहेत हे पोलिसांनीं ओळखलं-

सतत पांच दिवस पोलिस थॉम्पसनचा शोध करीत होते पण अजूनहि तो त्यांना सांपडला नव्हता. पोलिसांना वाटलं जंगलांतल्या कुठल्यातरी श्वापदानें त्याला खाऊन टाकलं असावं नाना तर्क सुरूं झाले कोणी म्हणालं, 'तो हवेत नाहींसा झाला असावा!'

पण थॉम्पसन जिवंत होता! दिवसा तो गुहेंत वा इतरत्र आसरा घेई व रात्रीं प्रवास करी कुठून तरी त्याला मिसुरीच्या बाहेर पडून कॅलीफोर्नियाला जायचं होतं. त्याला आतां तेथें असलेल्या त्याच्या बायकोला व दोन मुलांना भेटण्याची ओढ लागली होती.

होतां होतां १७ मार्च उजाडला! त्या दिवशीं दुपारीं दोन वाजतां थॉम्पसन Highway 34 रस्त्यावर आला. त्याचा पूर्वेला शोध चालला होता. पण तो आतां होता पश्चिमेला. एक 'मर्क्युरी' गाडी चालली होती. ड्रायव्हरला त्यानें हात केला. गाडी थांबल्यावर 'मला 'लिफ्ट' देतां कां?' म्हणून त्यानें विचारलें. 'हाच माणूस पोलिसांना पाहिजे आहे—ह्याची कांहींहि कल्पना नसलेल्या त्या ड्रायव्हरनें त्याला मोटारींत बसवलें व मोटार सुरूं केली.

U. S. 67 रस्त्यावर मोटार येतांच खूप गर्दी असल्यामुळें मोटार थांबवावी लागली. ड्रायव्हर बाहेर उतरून हवा खाऊं लागला. घिरट्या घालणाऱ्या पोलिसाचे सहज त्या मोटारीकडे लक्ष गेलं. ड्रायव्हरच्या शेजारीं बसलेल्या निर्विकार चेहऱ्याच्या माणसाकडे तो पाहत राहिला. त्याच्या डाव्या हाताचा अंगठा नाहीं हे त्यांच्या लक्षांत येतांच तो पुढें झाला व त्याला म्हणाला, 'तुझं नांव काय?'

'टेलर'

'तूं तुझा डावा हात उंच कर पाहूं.' पोलिस त्याला दरडावून म्हणाला. पण त्याच्या तोंडून हे शब्द बाहेर पडत नाहीं तोंच थॉम्पसननें त्याच्यावर गोळी झाडली. तो पोलिस विव्हळूं लागला तरी देखील त्यानें उलट गोळीबार सुरूं केला. थॉम्पसनच्या नाकावर एक गोळी लागली. पण त्यांच्या ह्या गोळीबारांत त्या 'मदतकर्त्या' ड्रायव्हरला






नाहक दोन गोळ्या लागल्या व तो खलास झाला ! रस्ता आतां मोकळा झाल्यामुळें थॉम्पसननें मोटार वेगांत सुरू करून पळ काढला तो विव्हळणारा पोलिस तशाहि स्थितींत पोलिस चौकीत गेला व हें नवें 'रामायण' त्यानें अधिकाऱ्यांना सांगितलें.

आतां अधिकारी थॉम्पसनवर चिडले होतें. त्यांनीं तीव्र वेगानें पाठलाग सुरू केला.

पोलिसांच्या हातावर तुरी देऊन पळालेल्या थॉम्पसनलाहि ह्या पाठलागाची जाणीव होती.

थॉम्पसनच्या नाकांतून रक्त वाहत होतं तरीही तो दोन मैल दूर गेला. नंतर त्याला एक घर दिसलं. शेजारीं एक गॅरेज उघडं होतं धांवपळीच्या जीवनाला कंटाळलेल्या थॉम्पसननें त्या गॅरेजमध्यें मोटार ठेवली व सरळ तो त्या घरांत शिरला. त्या घरांत कार्ल क्लेनहल व इव्हा क्लेनहन हे वृद्ध जोडपं रहात होतं. कार्ल पेपर वाचत होता, इव्हा आपल्या मुलीला फोन करीत होती. रक्तबंबाळ स्थितींत व हातांत पिस्तुल घेतलेला थॉम्पसन घरांत शिरलेला पाहून म्हातारा कार्ल घाबरला तर इव्हाची बोबडी वळली. मुलीला आईची एकदम घाबरगुंडी कां उडाली त्याची कल्पना नव्हती. तिला 'थॉम्पसन पुराण' माहिती होतं. कदाचित् तो आईच्या घरांत आला असेल, म्हणून तिनें पोलिसांना आपल्या माहेरच्या घरचा पत्ता दिला. पोलिस तिकडे निघाले ! थॉम्पसनला मात्र ह्याची कांहींच कल्पना नव्हती.

तो शांतपणें म्हणाला, घाबरूं नका मी तुम्हांला कांहीं करणार नाहीं. मला फक्त विश्रांती हवी आहे व कांहींतरी खायला द्या अगोदर नंतर बाथरूममध्यें जाऊन त्यानें आपलें तोंड स्वच्छ धुतलें व तो पुन्हां दिवाणखान्यांत आला. खिशांतून ५१७५ रुपये काढून त्यानें ते टेबलावर टाकले व तो त्या दांपत्याला म्हणाला, "हे तुमच्याजवळ ठेवा माझी रहाण्याची आणि जेवणाची रात्रीं सोय करा. आतां माझ्याजवळ फक्त ९० रुपये आहेत. मला तुरुंगांत पुन्हां जावं लागलं तर सिगारेटस् वगैरे खर्चासाठीं मी ते ठेवलेले आहेत."

नाईलाजानें इव्हानें त्याला खायला दिलें हें होईतो पोलिसांचा गराडा त्या घराभोंवती पडला. पोलिस अकस्मात आलेले पाहून थॉम्पसन पुरता घाबरला. तो इतका बावरला कीं, स्वतःकडे पिस्तुल असूनहि स्वतःचा खून करण्याची त्याला हिंमत झाली नाहीं. मुकाट्यानें तो पोलिसांच्या स्वाधीन झाला. 'स्वतःवर पिस्तुल चालविण्याची हिंमत झाली नाहीं.' असं त्यानें पोलिसांजवळ कबूल केलं.

त्याच्यावर व टकरवर वृद्ध गॉस, हॉस्पिटलांत मागाहून मेलेला क्रिटेन्डन, मर्क्युरी गाडीचा ड्रायव्हर ह्या सर्वांचा खून केल्याचा आरोप ठेवण्यांत आला. पण त्यांना गॅसचेंबरवर वर पाठविण्यांत येईल हे निश्चित आहे. जॉन्सनलाहि दुकान लुटल्याबद्दल शिक्षा ठोठावण्यांत येईल. 'इतिहासाची पुनरावृत्ती' होऊं नये.' म्हणून त्या तिघांची निरनिराळ्या ठिकाणीं कडक पहाऱ्यांत ठेवलेलं आहे !'

• • •










# 'कल्पतरुखालीं बैसलों जाण'

— डॉ. सरोजिनी बाबर

*एक काळ याच महाराष्ट्र देशांत असा होता कीं, खेड्यापाड्यांतून रत्नमाणकांची व मोत्या पोवळ्यांची खैरात घरोघरीं होत होती ! खेड्यांतील लोक हे विचारानें श्रीमंत होते. नवलाख तारांगणाच्या साक्षीनें जीवनांतील आनंद उपभोगीत होते, लाख दोन लाखांचीं साडी-चोळी घेतांना त्यांना फिकीर वाटत नव्हती.*

आमच्या ह्या महाराष्ट्र देशाचा इतिहास आणि भूगोल आजवर अनेकांनीं आपआपल्या परीनें समाजापुढें मांडण्याचा प्रयत्न केलेला आहे. त्याचप्रमाणें ह्या महाराष्ट्रांतील लोकांच्या संबंधींचे व भाषाविषयक विचारहि या ना त्या वाङ्मयीन माध्यमांतून प्रकट झालेले आहेत. त्यासाठीं कुणीं कुणीं मोठ्या अभिमानानें छत्रपति शिवाजी राजांच्या महाराष्ट्राचे आणि संतश्रेष्ठ ज्ञानदेव तुकोबारायांच्या महाराष्ट्राचे दाखले अभिमानानें जनलोकांच्यापुढें ठेवले आहेत; ह्या महाराष्ट्राच्या वैशिष्ट्यांचीं स्फूर्तिदायक बोलणीं केलेली आहेत.

परंतु ह्याच महाराष्ट्राच्या भवितव्यासंबंधी आपले विचार प्रकट करतांना कांहीं विचारवंतांनीं परवां मोठी साशंकतेची भाषा केली. त्यांची ही भाषा मला जेवढी निराधार वाटली, तेवढीच ती निरोगी विचारसरणीचीहि वाटली नाहीं. कांहींतरी जबरदस्तपणानें मनांत खटकतें आहे परंतु त्याची वाच्यता मात्र अगदीं वेगळ्यारीतीनें म्हणजे धरलें तर चावतें आहे व सोडलें तर पळतें आहे अशा रीतीनें व्हावी, तसाच कांहींसा प्रकार त्यावेळीं घडला.

त्यामुळें या महाराष्ट्रांत नव्यानेंच स्थापन होणारी जिल्हा कौंसिलें कशाप्रकारचीं असावींत यापेक्षां तीं चालविणें ज्यांच्या हातीं जाईल ते लोक प्रतिनिधि अजून कसे तयार झालेले दिसत नाहींत, यावरच अधिक भर देण्यात आला. त्या कारणानें या विषयासंबंधींचा कायदा झाल्यानंतर त्यासंबंधीचा उहापोह करण्यासाठीं म्हणून पुण्यामध्यें आयोजित केलेला खास परिसंवाद म्हणावा तसा रंगला नाहीं. आणि त्याचा परिणाम असा झाला कीं, ही चर्चा राजकीय अगर आर्थिक दृष्टिकोन लक्षांत घेऊन उच्च पातळीवर होणें अगत्याचें होतें तें तसें व्हईं शकलें नाहीं. एवढेंच नाहींतर या विकेंद्रीकरणाचा जो मुख्य हेतु कीं, योजना लोकांच्या असाव्यात व त्यांनींच त्या राबवाव्यात आणि पंचायतींच्या क्षेत्रांतील लोक जागे व्हावेत, हा मुळी बऱ्याचशा प्रमाणांत बाजूलाच गेल्यासारखा झाला. आणि ग्रामीण भागांतील वैचारिक नेतृत्वासंबंधींच वाजवीपेक्षां अधिक अशी साशंक मनोवृत्तीनें माखलेली चर्चा झाली.

वास्तविक ह्या जिल्हा कौंसिलच्या कार्याची सूत्रें लोक प्रतिनिधींच्या हातीं जाणें ही गोष्ट या महाराष्ट्रांत नव्यानेच घडली आहे अशांतील मुळींच भाग नव्हता. तरीपण या कायद्याने प्रस्थापित केलेल्या कांहीं गोष्टी शहरांतील विचारवंतांना खटकत होत्या. त्यामुळे लोक प्रतिनिधींच्या तंत्राने सरकारी अधिकारी वर्गाला वागावे लागेल, तेव्हां हे लोकप्रतिनिधी विशिष्ट मोनॉपलींतून येणारे नसावेत, याविषयीहि अनेक विचार पुढे आले.

त्यामुळें जिल्हा कौन्सिलतर्फे जिल्ह्याचें राज्य कसें चालेल यापेक्षां खेड्यांतून तें राज्य चालविण्यासाठीं पुढें येणारी मंडळी कोणत्या लायकीची आहेत ह्याच गोष्टीची अधिक चर्चा कां व्हावी हें कळेनासें होतें. कारण याबाबतीत मतभेदाला भरपूर वाव ठेवूनहि माझ्या-








अनुक्रमणिका

सारख्याला असं वाटतं कीं, अशी भीति ही निश्चितपणें निराधार आहे. हा विश्वासाचा भाग आहे. हा ग्रामीण जनतेबद्दल जिल्हा-ळ्याचा प्रश्न आहे. आणि नागर व ग्रामीण जीवन यांत एकजिनसीपणा निर्माण करणारी परिस्थिति लक्षांत घेण्याची गोष्ट आहे.

आणि म्हणून राज्यसत्तेचं विकेंद्रीकरण या रीतीनं होत असतांना व जिल्हा हा शासनाचा घटक म्हणून स्विकारला असतांना हें विकेंद्रीकरण वरच्या थरावरून खालीं येत आहे कीं, उलट दिशेनं घडूं पहात आहे हा मुद्दा विशेष महत्त्वाचा नाहीं. तर ग्रामीण भागांतील जनतेवर विश्वास ठेवून ह्या प्रयोगाकडे जिल्हा-ळ्यानं पहाणं हा भाग महत्त्वाचा आहे असं मी तरी मानतें. कारण हे लोक समजतात एवढी कांहीं ग्रामीण जनता खास खुळी व मागासलेली राहिलेली नाहीं. खात्रीनं या जनतेंत नव्या युगाचा झपाट्यानें प्रवेश होतो आहे आणि लोकहि जाणकार झालेले आहेत.

सध्यां खेड्यांतील जीवनांत आमूलाग्र बदल घडवून आणतां येईल अशी सुखसोयींची योजना आंखली गेली आहे. सरकारच्यावतीनें पंचवार्षिकयोजनांची आखणी व अंमलबजावणी होते आहे. आणि गावकरीहि त्या कामीं आवर्जून लक्ष घालीत आहेत. हळुहळूं श्रमदानाची किंमत आळखली जात असून दळणवळणांच्या साधनात फरक पडूं लागलेला आहे. विहिरी व शाळागृहें बांधलीं जात आहेत. तलाव खोदले जात असून पिण्याच्या पाण्याची सोय उपलब्ध होते आहे. दवाखाने व औषधोपचाराच्या सुखसोयींची तरतूद केली जात आहे. साक्षरता प्रसार झपाट्यानें होतो आहे. म्हणजे खेडा आता सर्वपरानं स्वयंपूर्ण होण्याच्या मार्गाला लागलेलं आहेत. खेड्यांतील जीवनांत आता नवचैतन्याहि भरूं लागलं आहे. लोक शिकूं लागले आहेत. आणि पाटबंधारे व विद्युत्योजना यांच्यामुळें सहकाराची व उद्योगधंद्यांतील विकासाचीहि कल्पना सर्वत्र स्वीकारली जाते आहे. तेव्हां अशा स्थितीमध्यें ग्रामीणभागांतून येणाऱ्या नेतृत्वाविषयीं शहरवासीयांनीं साशंक कां रहावं याचं कोडें वाटतं.

अशावेळीं एक तर खेड्यांतील लोकांच्याबद्दल ह्या विचारवंतांच्या मनांत आपुलकी नसावी किंवा आदर भावानें त्यांच्याकडे पहायची नजर त्यांनीं मिळविलेली नसावी, असा विचार माझ्यासारख्याच्या मनांत डोकावून जातो आणि म्हणूनच ग्रामीण जीवनाचा व तेथील लोकांचा ह्या मंडळींनीं जरूर अभ्यास करायला पाहिजे असें निदान मला तरी वाटते.

कारण परवाच्या सार्वत्रिक निवडणुकांचें वेळीं जी मंडळीं निरनिराळ्या खेड्यापाड्यांतून फिरली असतील त्यांनीं हें पाहिलें असेल कीं तेथें आतां फारच जागृति झालेली आहे. निरपेक्ष भावानें आपणाला हवें तें नेतृत्व उभे करण्यासाठीं ह्या ग्रामवासियांनीं अविश्रांत श्रम घेतलेलें आहेत. समाजकारण व राजकारण विचाराशंतीं पचनीं पाडून त्यामध्यें यशस्वी होण्याचा ह्या लोकांनीं जरूर प्रयत्न केला आहे. आणि म्हणून उमेदवार कोण आहे या पेक्षां आपल्या पक्षाच्या उज्वल भवितव्यासाठीं रात्रंदिवस या खेडुतांनी कष्टाची खाण उपसली आहे. स्वयंस्फूर्तीनें आपल्या भागाच्या विकासाची आंखणी करून त्याकामीं अंमल बजावणी कशी केली याचाहि विचार अवश्य केला आहे. म्हणजे विकेंद्रीकरणाच्या कायद्यानें ठरविलेली जबाबदारी पेलण्याचें सामर्थ्य या ग्रामीण भागांतील मंडळींनीं निश्चितपणें कमाविलेलें आहे. आणि तें ओळखूनच महाराष्ट्रामध्यें लोकप्रतिनिधित्वाला मान देऊन जिल्हा कौन्सिलची रचना करण्यांत सरकारनें एकप्रकारें पुरोगामी पाऊल उचललें आहे.

त्यामुळें बिनसरकारी नोकरांना काम करावें लागणार आहे, म्हणून कोणी बिचकून जाण्याचें कारण नाहीं. तसेंच खेड्यांतील मंडळांनीं आत्मनिरीक्षण करून आपल्याला हें झेपेल किंवा कसें याचीहि शंका पुढें येण्याचं कारण नसावें. त्याचबरोबर हें ग्रामीण नेतृत्व विशिष्ट जातींच्या मक्तेदारांतूनच निर्माण होईल ही भीति उराशीं बाळगून, लोकशाही विकेंद्रीकरणाचा हा प्रयोग विशिष्ट पक्षाकडून होतां कामा नये, असा विचार समाजापुढें ठेवून गैरसमाजाचें गाठोडेंहि कोणीं पाठाशीं बाळगूं नये.

कारण स्थानिक अडचणी दूर करूं शकेल अशी प्रभावी शक्ति या खेडुत मंडळींच्या अंगीं अद्याप आलेली नाही हें गृहीत धरून अशीं बोलणीं पुढें येतात, तेंच मुळीं चुकीचें आहे. वास्तविक ह्याच महाराष्ट्रांतील खेड्यांपाड्यांनीं जुन्या काळच्या युगामध्यें खेड्यांतील स्वयंपूर्ण जीवन अनुभविलेलें आहे. आणि सर्वपरानें उच्च प्रकारची विचारसरणीहि या मंडळींनीं आपल्या वैयक्तिक खजिन्यांत कित्येक पिढ्या बाळगलेलो आहे. त्यामुळें अधिकाधिक अधिकार देऊन पंचायती ह्या कार्यक्षम झाल्या पाहिजेत. या विचारसरणीच्या मागें पंचायत हा मूल घटक मानून समाजाचें स्वास्थ्य राखलें गेलें पाहिजे याची कल्पना या मंडळींना जरूर आहे. त्यांच्या ठिकाणीं पदवीधारण करणारें शिक्षक अभावानें दिसून येत असलें तरी संस्कृतीचा फार मोठा वारसा त्यांच्या धनदौलतीमध्यें जमा झालेला आहे.

एक काळ याच महाराष्ट्र देशांत असा होता कीं, खेड्यापाड्यांतून रत्नामाणकांची व मोत्यापोवळ्यांचीं खैरात घरोघरी होत होती! सुंदर कल्पनांच्या गोळ्या फुटत होत्या. आणि माणसाच्या कल्पनेची भरारी व झेप आकाशालाहि गवसणी घालूं शकत होती. त्यामुळें त्या खेड्यांतील लोक हे विचारानें श्रीमंत होतें. नवलाख तारांगणाच्या साक्षीनें जीवनांतील आनंद उपभोगीत होते, लाख दोन लाखांची साडी-चोळी घेतांना त्यांना फिकीर वाटत नव्हती. आणि अगदीं स्वाभाविकपणें आपल्या नृत्योत्सवामुळें धरित्रीवरची धूळ वरच्या सूर्यदेवाला गदाळून टाकते व म्हणून त्या सूर्यदेवाच्या स्नानासाठीं दूधसागर निर्माण होतो अशा भव्य कल्पना त्यांना सहजासहजीं सुचत होत्या. त्यांच्या बोलण्याला अशावेळीं बाळसें चढत होतें आणि उपमा दृष्टांतांचीं लयलूट करीत ही मंडळी आपल्या कल्पना शक्तीचा तलास लावूं शकत होती.

पण परक्या लोकांच्या सहवासामुळें आणि नवीन जगांतील सुधारणांच्यामुळें या गोष्टी मागासलेल्या म्हणून मानल्या गेल्या आणि मग स्वाभाविकच खेडींपाडीं हीं त्या दृष्टीनें काळवंडून जात मागें पडलीं. एवढेंच नाहींतर सुधारलेल्या जगाच्या दृष्टीनें त्यांच्याकडे विचारवंतांनीं दुर्लक्ष केलें व एक प्रकारच्या निराशेनें ह्या मंडळींना जखडून टाकलें. आणि दुर्दैवानें ही निराशा पुढें मग बळावतच गेली. त्याचा परिणाम असा झाला कीं, खेड्यांतील ही सामान्य माणसें मागें पडत गेलीं. आणि सुधारलेल्या या जगांतील विचार-

अनुक्रमणिका






वंत झपाट्यानें पुढें गेले. मानवी जीवनांतील एकजिनसीपणाला जणुं त्या कारणानें खो बसत गेला.

परंतु भारत स्वतंत्र झाल्यानंतर पुन्हां ग्रामीण विकासाची बोलणी सरकारीरित्या होऊं लागलीं. त्या दृष्टीनें प्रयत्नालाहि सुरवात झाली आणि ठराविक लोकांच्या हातीं असणारी राज्ययंत्रणेची सत्ता आतां लोकशाही तंत्रानें चालणाऱ्या लोकप्रतिनिधीच्या हातीं येत चालली.

पण दुर्दैवाची गोष्ट अशी कीं, पुष्कळशा मंडळींना हा विचारच मानवत नाहीं. आणि सरकारी योजनेंत कुठेंतरी लोकांचा हात असतो किंवा केवळ कायद्यानें सर्व व्यवस्थित होतें असें नाहीं. ही विचारसरणी पुढें वेगानें सरसावली. त्यामुळें ग्रामीण नेतृत्व हें अल्पसंतुष्ट असल्याचा दावा केला जाऊं लागला. एवढेंच नाहीं तर सर्वप्रकारच्या बुद्धिजीवी लोकांचेच सरकार प्रस्थापित व्हावें. असली कल्पना विचारवंतांच्या मनांत शिरूं लागली.

या संदर्भांत खेड्यापाड्यांतून अल्पसंख्यांक फार असतात व त्यांत मराठेच अधिक असून मतभेदांना आणि भांडणतंट्यांना ऊत येतो असाहि एक विचार प्रकर्षानें पुढें येत गेला. त्यामुळें खेड्यांतून पुढें येणारें स्थानिक नेतृत्व ह्या जिल्हा कौन्सिलच्या दृष्टीनें कितपत योग्यतेचें असेल या संबंधींची चर्चा वाढत्या वयाचें लेणें लेत पुढें चालली. कारण या नव्या विकेंद्रीकरणाचे कामीं शहरांतील मंडळींना वाव नव्हता हें एक खटकणारें कारण या विचाराच्या निमित्तानें पुढें आलें, आणि दुसरें म्हणजे शहाणपणाची मक्तेदारी फक्त सुशिक्षितांच्या–पुरतीच मर्यादित असल्याच्या कल्पनेला उचलून धरण्यांत आलें. म्हणजे लोकशाही पद्धतीनें निवडणुका लढवावयाच्या तर एखादा अशिक्षित मनुष्यहि पुढें येईल व विकेंद्रीकरणाच्यामुळें निर्माण होणाऱ्या सत्तेचा अधिकारी बनेल, या गोष्टीचें कोणाला बरें वाटेनासें झालें.

परंतु अशी भीति व्यक्त करून ह्या विषयांसंबंधी चर्चा करणाराच्या हें ध्यानांत आलें नाहीं कीं, अशाच एका खेड्यांतून महाराष्ट्राच्या मुख्य मंत्र्याचा जन्म झाला आहे. आणि ग्रामीण भागांतून निर्माण झालेल्या नेतृत्वानेंच आज महाराष्ट्राचा राज्यकारभार यशस्वीरीतीनें चालवित आहे. ना. यशवंतराव चव्हाणांनीं ग्रामीण नेतृत्वाचें आवाहन मोठ्या जिम्मेदारीनें स्वीकारून आपलें कर्तृत्व पणाला लाविलें आहे. तेव्हां जी गोष्ट सबंध राज्याचे बाबतींत शक्य झाली ती जिल्हा कौंसिलचे बाबतींत कां अशक्य व्हावी हा विचार करण्यासारखाच प्रश्न होय. अर्थात् अशी शंकाच मुळीं निराधार आहे. याचा कौल गेल्या सार्वत्रिक निवडणुकांनीं दिलेला असून या प्रश्नाला आपोआप निकालांत काढले आहे.

त्यामुळें विरोधी पक्ष लोकशाहींत प्रभावी असला पाहिजे हें मान्य करूनहि काँग्रेस पक्षानें प्रचंड बहुमत मिळवून हें महाराष्ट्र राज्य लोकांचे प्रतिनिधि उत्तम प्रकारें चालवूं शकतात याचा दाखला या निवडणूकांनीं दिलेला आहे हें नाकबूल करून चालणार नाहीं. तेव्हां अशा विषयावर चर्चा करणारांना माझी एकच विनंति राहील कीं, आपण सर्वजण महाराष्ट्राचे भाग्यविधाते आहोंत हें विसरूं नका.

ना. यशवंतराव चव्हाणांचें कर्तृत्व आणि पंडित जवाहरलाल नेहरूंची पुण्याई जमेस धरून काँग्रेस पक्ष परवांच्या निवडणुकांत प्रचंड बहुमत मिळवूं शकला आहे. त्यामुळें हें मिळविलेले यश पाठीशीं घेऊन आतां प्रत्येक कार्यकर्त्यानें या महाराष्ट्राला मोठें करण्याचें व्रत अंगिकारणें अगत्याचें आहे. कारण आपणां सर्वांच्या वागणुकीवरच आमच्या समाजच्या पालनपोषणाची जबाबदारी येऊन पडलेली आहे. सरकार आपले आहे. आपण सरकाराचे आहोंत. आणि आपल्यावतीनें आपले प्रतिनिधि हें राज्य चालविणार आहेत.



म्हणून आ आपल्या जीवनाचे जे नियम करावयाचे ते अकारण स्पर्धा आणि संचयवृत्ती ह्याचेवर आधारित न ठेवतां तें सहकार्यावर अधिष्ठित होतील हें पाहिलें पाहिजे. त्यासाठीं आपण कर्तव्यावर अधिक भर देऊन वागणें अगत्याचें आहे त्यासाठीं आपण आपल्या शिक्षणालाच नव्या प्रकारचे वळण दिलें पाहिजे.
माणसाला माणूस बनविणारें शिक्षण आपण मानवतेचे पुजारी होऊन दिलें पाहिजे व घेतलेंहि पाहिजे.

कारण आपल्यावतीनें जो आपल्या राज्याची धुरा उचलतो त्याला आपण धुरंधर म्हणतो. म्हणून कामाची विभागणी हवी आहे. ह्या धुरंधरांना होणार नाहीं तें काम इतरांनीं करावयाचें आहे. त्यायोगें सर्वांच्या इच्छा–आकांक्षा पुऱ्या होणार आहेत. आणि ह्या वृत्तीमधूनच खरी लोकशक्ति उभी रहाणार आहे.

आमच्या नव्या महाराष्ट्र राज्याचा हा वाढदिवस साजरा करतांना आपण लोकशाहीवर विश्वास ठेवून वागण्याची सवय तर स्वतःला लावलीच पाहिजे परंतु सर्वांच्यावर विश्वास ठेवून आपल्या सरकारला खरी मदत करण्याचें वचन स्वतःलाच देणें अगत्याचें आहे. तरच आपण आपल्या देशाची योग्य सेवा केली असें होईल. नाहीं तर एरव्हीं केलेल्या कायद्याचें पालन व संगोपन कसें होईल हें न पहातां तो कायदा बरोबर कसा नाहीं या विचारातच आपली शक्ति अनाठायीं खर्ची टाकल्यासारखे होईल.

म्हणून नवीन कायद्यानुसार करण्यांत येत असलेला हा लोकशाही विकेंद्रीकरणाचा प्रयोग फार महत्त्वाचा आहे असें मानूनच तो यशस्वी करण्यासाठीं आपल्या विचारांचा वापर योग्य त्या रीतीनें करणें हें आजच्या विचारवंतांचें आद्य कर्तव्य ठरेल. त्यासाठीं या महाराष्ट्राच्या प्रत्येक नागरिकानें सदैव जागरूक राहून हा महाराष्ट्र प्रगतिपथावर कसा राहील यासंबंधी खटपट केली पाहिजे. आपलें जीवन सदोदित गतिमान तर राहीलच. पण आपल्या सर्व बांधवांना या देशांत संपूर्ण सुरक्षितता वाटेल यासंबंधींहि आवश्यक ती खबरदारी घेणें अगत्याचे आहे, स्वतंत्र रीतीनें, सद्भावानें सहिष्णुवृत्तीनें आणि लोकशाही तंत्रानें नवयुग निर्माण करावयाचें हा आजच्या महाराष्ट्राचा खरा युगधर्म आहे असें मी तरी निदान मानतें. आणि आतां आपण तो प्रयोग महाराष्ट्रांत—खेड्यापाड्यांत विखुरलेल्या नव्या महाराष्ट्रांत करून पहाणार आहोत, त्यानें हा आपला युगधर्म यशस्वी होणार आहे. ● ● ●








आज तीन दिवस झाले, काशी मला छळते आहे. लिहायला बसलों की तिचा चेहरा समोर उभा राहतो. तिची ती आर्त नजर माझ्याकडे रोखून पाहाते, आणि मग मी बेचैन होतों. कांहीं सुचत नाहीं. अगतिकतेच्या जाणिवेनें मन शरमिंदे होतें. पेन हातांतून गळून पडतें. खरं म्हणजे काशीबद्दल मी न लिहिण्याचे ठरविलें होतें. कां कुणास माहित परंतु काशीची आठवण आली तर मला अपराध्यासारखें वाटूं लागतें. मी तिच्याबद्दल कांहींच करूं शकत नाहीं याचें दुःख वाटतें.

काशी माझ्या आयुष्यांत आली आणि गेली. परंतु माझ्या मनाला चांगलाच धक्का देऊन गेली. तिचा आणि माझा सहवास फक्त एका रात्रीचा. परंतु ती रात्र माझ्या स्मरणांत कायमची चिकटून बसली. माझ्या सभ्यतेच्या, उदारतेच्या निर्बलतेची आणि परीटघडीच्या संस्कृतीच्या पोकळपणाची जाणीव देत, चटके देत कायमची घर करून बसली.

दक्षिण महाराष्ट्रांतल्या त्या गांवीं मी पहिल्यांदाच गेलों होतों. माझ्या सहकाऱ्याचें तें कार्यक्षेत्र असल्यामुळें तोच वरचेवर जाऊन येई. त्यावेळीं तो टाईफॉईडनें आजारी पडला आणि मलाच त्या गांवीं जावें लागलें, त्या गांवीं मी अनोळखी असलों तरी आमच्या कंपनीचा नांव लौकिक चांगला असल्यामुळें मला विशेष प्रयास पडले नाहींत. गांवातील औषध विक्रेत्याना व डॉक्टरांना भेटून औषधांच्या ऑर्डर्स मिळविल्या. दुपारपर्यंत माझं काम आटोपलं. शक्य झालंच तर मी त्याच दिवशीं निघून पुण्याला परतणार होतों. परंतु दुसऱ्या दिवशीं सकाळपर्यंत गाडी नव्हती. त्यामुळें त्या दिवशीं संध्याकाळीं मला तिथेंच राहावें लागलें.

दुपारच्या प्रहराला एक मस्तपैकी झोप ताणून मी उठलो तेव्हा संध्याकाळचे साडे पांच वाजले होते. हॉटेलमधल्या पोऱ्यानेंच मला येऊन उठविलें आणि चहा आणून दिला. ताजातवाना होऊन कपडे बदलून मी सहज भटकायला म्हणून बाहेर पडलों. गांवांत येतांना



# कैदमें है बुलबुल

*माझ्या भिजलेल्या अंगाला घाम फुटला. विड्यानें तिचे ओठ रंगले होते. डोळ्यांतील काजळानें नजरेला नखरेलपणा आला होता. पांढरें झिरझिरीत पातळ ती नेसली होती. छातीवरून अल्लद खालीं सोडलेल्या पदराआडून तिची भरदार वक्षःस्थळें डोकावत होतीं......*



पाहिलेला माळ मला फार आवडला होता. तिथें एकांतांत उघड्यावर कांहींतरी वाचत बसावें म्हणून मी माझी हँडबॅगहि सोबत घेतली.

गांव चांगलाच मोठा होता. मोठी बाजारपेठ असल्यामुळें रस्त्यावर बरीच वर्दळ होती. धुळीनें भरलेल्या त्या रस्त्यांवरून कधी एकदां निसटतों असें मला होऊन गेलें.

माळावर आल्यानंतर मात्र जरा बरें वाटलें. उष्म्यानें हैराण झालेल्या जिवाला गार झुळुकीनें सांत्वन केलें. मी एक इंग्लिश कादंबरी उघडून वाचत बसलों. दूर मुलें हुतूतू खेळत होतीं. कांहीं अंतरावरून नागमोडी वळणानें गेलेल्या रस्त्यावर बैलगाडीची एक रांग संथपणें चालली होती. गाडीवानांनीं बैलांना उद्देशून उच्चारलेले शब्द अस्पष्टपणें कानांवर येत होते.

मी त्या पुस्तकांत किती वेळ हरवून बसलों होतों तें मलाच समजलें नाहीं. काळोखाचा किनखापी बुरखा अलगदपणें पृथ्वीनें आवळून घेतला. अक्षरें दिसेनाशीं झालीं आणि मी भानावर आलों. थंडगार वारे सुटले होते. दूर डोंगरापाशीं वाऱ्यानें पालापाचोळा गिरक्या देत उंच उडविला होता. मी पुस्तक मिटलें. बॅगेमध्यें ठेवून दिलें आणि बॅग उशीला घेऊन त्या हिरवळीवर आडवा पडलों. डोक्यांत निरनिराळे विचार येत होते; व्यवसायाचे, संसाराचे आणि साहित्याचे. नव्या नव्या कल्पना सुचत होत्या. अंधाराच्या पार्श्वभूमीवर गांवांत लागलेले दिवे लुकलुकत होते. आपलेपणा वाटण्यासारखी खरं म्हणजे त्या गांवाबद्दल माझी भावना नव्हती. वृत्तीमुळें कितीतरी गांवांना अशा उडत्या भेटी मी नेहमींच देत होतों. परंतु त्या ठिकाणीं, त्या वेळीं, त्या गांवाबद्दल मला उगीचच आकर्षण वाटूं लागलें. त्या हिरवळींतील ती जादूहि असेल कदाचित्. त्या दूरच्या दिव्यांतील आर्तकतेमुळेंहि तसें झालें असेल. परंतु ती संध्याकाळ माझ्या मनावर पुरती बिंबली. वाटायला लागलें कीं रात्रभर इथेंच पडून राहावें.

अंगावर पाण्याचे थेंब पडले नसते तर मी तिथें कितीवेळ पडून राहिलों असतो सांगतां येत नाहीं. आकाश अचानक ढगाळलें होतें. वाऱ्यांत जोश आला होता. हॉटेलमध्यें जायचें म्हणजे मला एक मैल तरी सहज चालावें लागलें असतें. मी चट्कन् उठलों. कोटाला चिकटलेली गवताची कुसें झटकली आणि लगबगीनें रस्त्याला लागलों.

काळोख आतां चांगलाच दाटला होता. पायाखालचें कांहींच दिसत नव्हतें. रस्त्यावरची वर्दळ पूर्णपणें बंद झाली होती. गांव अजून दूर होता. आणि पावसाला सुरुवात झाली. आडोशाला हि कांहीं दिसेना. फर्लांगभर अंतरावर एक घर दिसलें आणि त्या दिशेनें मी धांवत सुटलों.

त्या घराच्या उंबरठ्यावर उभा राहून मी माझी हँडबॅग खालीं ठेवली. खिशांतला हातरुमाल बाहेर काढून चेहरा पुसला. कपडे तर पार भिजले होते. केसांतूनहि पाणी निथळत होतं. धापा टाकीत मी तिथें उभा राहिलों. पावसाचा जोर वाढत चालला. ढग नगारे बढवूं लागले. आणि विजांचा नाच सुरू झाला. मी उभा होतों त्या ठिकाणीहि पाण्याचे चपकारे बसूं लागले. दार बंद होतं, त्यामुळें मला आंतही शिरतां येईना. दारावर थापा माराव्यात का या विचारांत असतानांच माझ्या पाठीमागची खिडकी उघडली.

'कोण आहे ?' बायकी आवाज आला.

'मी.'

'आतां या पावसांत कोण आलंय् मरायला.'

स्वरांत हिरमुसलेपणा होता. स्वतःशींच ती पुटपुटली तरी शब्द मला ऐकूं आले होते. मी भांबावलों. काय बोलावं समजलं नाहीं. तरीसुद्धां धैर्य करून विचारलं.

'जरा दार उघडतां कां ? मी भिजतों आहे इथं.'

दाराची कडी वाजली आणि पाठोपाठ दार उघडलं गेलं. आंतील रॉकेलच्या दिव्याचा प्रकाश रांगत बाहेर आला.

'या.'

मी आंत शिरलों. संपूर्णपणें प्रकाशांत आलों. तिचाहि चेहरा माझ्या नजरेंत भरला आणि माझ्या भिजलेल्या अंगाला घाम फुटला. विड्यानें तिचे ओठ रंगले होते. डोळ्यांतील काजळानें नजरेला नखरेलपणा आला होता. पांढरें झिरझिरीत पातळ ती नेसली होती. छातीवरून अल्लद खालीं सोडलेल्या पदराआडून तिची भरदार वक्षःस्थळें डोकावत होती. मी एका वेश्येच्या घरांत शिरलों आहे हें समजायला मला वेळ लागला नाहीं. मला अवघडल्यासारखें झालें. काय बोलावें सुचेना. माझी गोंधळलेली अवस्था तिच्या लक्षांत आली असावी. एक खुर्ची पुढें करीत ती म्हणाली,

'बसा.'

मी त्या खुर्चीवर बसलों.

'या गांवचे दिसत नाहीं तुम्हीं.'







'नाहीं. मी पुण्याला असतों. कंपनीच्या कामाकरितां परवां आलों होतों. उद्यां जाणार आहे, सकाळच्या गाडीनें.'

'माफ करा हं, मघाशीं मी दार उघडायला उगीच उशीर केला. किती भिजलायत् तुम्हीं.'

ती आंत गेली आणि एक कोरडा टॉवेल आणून तिनें माझ्या हातांत दिला.

'जरा आराम करा. पाऊस कांहीं इतक्यांत थांबेलसें वाटत नाहीं.'

पावसानें खरोखरच झोड उठवली होती. 'कडाड् कडम्'च्या गर्जनाहि ज्यास्त होत चालल्या होत्या. मी बुटाचे बंद सोडले. टॉवेलनें केस आणि चेहरा पुसला.

'थँक्स' म्हणत मी टॉवेल तिच्याकडे परत केला.

'रेनकोट न घेतां निघाल्याचं प्रायश्चित् मिळतंयू मला.' मी म्हटलं.

'कुठें उतरलाहांत ?' तिनें विचारलें.

'स्वातंत्र्य लॉजमध्यें'

'म्हणजे इथून जवळ जवळ एक मैल आहे. आतां या वेळेला इथें टांगा मिळणेंहि मुष्किलीचं आहे.'

'थांबेल पाऊस आतां.'

'ते झालंच; परंतु तुम्ही कांहींसुद्धां संकोच बाळगूं नका !'

'नाहीं नाहीं" मी उसने हसत म्हणालों. खरं म्हणजे माझी छाती धडधडत होती. चुकूनहि आजपर्यंत कधीं मी वेश्येच्या घरांत पाऊल ठेवलं नव्हतं. माझं चरित्र्य धुतल्या तांदळासारखें आहे असा सगळी-कडे माझा नांवलौकिक होता. त्यामुळें एका वेश्येसमोर रात्रींच्या वेळीं एकांतात बसून राहणें म्हणजे माझ्या मनावर मोठेंच दडपण ठेवल्या-सारखें झालें होतें. पुन्हां पुन्हां लतेचा चेहरा डोळ्यासमोर आणायचा मी प्रयत्न करूं लागलों. घरीं ती उद्यां मी येणार म्हणून माझ्या वाटेकडे डोळे लावून बसली असेल. अशा वेळीं माझ्या हातून बरं वाईट कांहीं न घडतां मी या प्रसंगांतून सुखरूपपणें बाहेर पडूं दे असा धांवाहि करूं लागलों.

पाणी आंत येत होतं म्हणून तिनें खिडकी लावून घेतली. खिड-कीला पाठ टेकून ती उभी राहिली. दोन्हीं हातांच्या तिनें घड्या घातल्या. तिला बसायला जागा नव्हती हें माझ्या लक्षांत आलें, परंतु पाहुण्यांच्या लोचटपणानें मी खुर्चीवर बसून राहिलों. तीन खोल्यांचा खण होता तो. किलकिल्यादारांतून आंतील पलंग दिसत होता. भिंती-वर चार दोन कॅलेंडरें व मध्येंच साईबाबांचा एक फोटो लावला होता. माझ्या खुर्चीजवळ भिंतींत असलेल्या कोनाड्यांत एक कंदील जळत होता. पलिकडच्या कोपऱ्यांत एक छोटेसे स्टूल. त्याच्यावर पानसुपारीचं तबक होतं.

या सगळ्या वस्तूंवरून नजर फिरवून मी स्वस्थ बसलों. काय बोलावें समजत नव्हतें. शेवटीं तिनेंच विचारलें,

'कुठें काम करतां'

'औषधी कंपनीचा विक्रेता आहे मी. तुमच्या या गांवांला पहिल्यांदांच आलों आहे.'

'फिरतीची नोकरी वाटतं ?'

'हं.'

'मग किंचित् थांबून ती म्हणाली,

'पान वगैरे घेणार का ?'

'नाहीं. मी पान खात नाहीं.' मी म्हटलं, 'तुमची हरकत नसेल तर मी वाचत बसतों इथं.'

'बसा ना.'

ती आंत गेली. मी बॅगेतून मघाशीं अर्धवट राहिलेलं तें पुस्तक काढलं, आणि कंदीलाच्या प्रकाशांत वाचूं लागलों. शेवटचीं थोडीशींच पानें राहिल्यामुळें माझी उत्सुकता शिगेला पोचणि होती. थोड्याच वेळांत मी त्या घराला संपूर्णपणें विसरून गेलों. शेवटचं प्रकरण संपलं आणि मी पुस्तक मिटलं.

समोर माझ्याकडे एकटक पाहात ती उभी होती. तिच्या त्या नजरेंत विलक्षण उत्सुकता मला दिसली.

'माफ करा, तुमच्या बॅगेवरचं मी नांव वाचलं. तुम्हीं गोष्टी लिहितां का ?'

त्या प्रश्नानें मी चाट पडलों. तिच्याकडून मी त्या प्रश्नाची अपेक्षा केलीच नव्हती. तिच्यापर्यंत माझं लेखन पोचलं आहे हें जाणून मला जरा अभिमानहि वाटला.

'हो. कां."

'मघाशींच कां नाहीं सांगितलंत ? माझं भाग्य थोर म्हणून देवानंच पाठवलं तुम्हांला माझ्याकडे. किती दिवस झाले, तुम्हांला पाहीन म्हणतें. मासिकवाल्यांनीं अजून तुमचा फोटोहि छापला नाहीं. नाहीं तर मी तुम्हांला ओळखलं असतें. माफ करा.'

तिच्या बोलण्यांत आदर ओतप्रोत भरला होता.

'वाचतां येतं तुम्हांला ?' माझं आश्चर्य दाबून ठेवणं मला असह्य झालं.

'मराठी पांच पुस्तकं शिकलें आहे मी.'

'छान, माझ्या गोष्टी वाचतां कीं काय !'

## झाकली मूठ



रमण महर्षींच्या दर्शनासाठीं लोकांची गर्दी जमली होती. जमलेल्या गर्दींत महर्षींची आई पण होती. निराश स्वरानें ती आजूबाजूच्या लोकांनां म्हणाली, "हा माझा पुत्र, पण माझ्याशीं एक शब्दहि बोलला नाहीं..." आईचं तें दुःख आजुबाजूच्या लोकानां फार झोंबलं. त्यापैकीं एकजण रमण महर्षींनां म्हणाला, "महाराज आपण मौन पाळलं आहे हें खरे. पण आपल्या जन्मदात्या आईची व्याकुळ मुद्रा पाहून आपण एखादा शब्दहि कां नाहीं बोललांत ? मौनाचा भंग होईल असं वाटलं तर निदान कांहीं तरी लिहून तिचं समाधान करायचं होतेत—!"

महर्षींनीं त्याला कागदावर लिहून कळवलं "जें व्हावयाचं आहे तें कोणी टाळूं शकणार नाहीं किंवा जें व्हावयाचं नाहीं तें कांहींहि केलेत तरी होणार नाहीं. अशा स्थितींत बडबडण्यापेक्षां मौन राखणंच शहाणपणाचं नव्हे का ?"



अनुक्रमणिका

'वाचतें एवढंच नाहीं, तर त्या मला खूप खूप आवडतात. वाचनाचा मला खूप नाद आहे हो. खूपखूप वाचावसं वाटतं. जाड जाड पुस्तकं वाचावींशीं वाटतात. परंतु या गांवांत पुस्तकं कुठलीं मिळायला ! एकदां बेळगांवला गेलें होतें तेव्हां जुन्या मासिकांचे बांधीव अंक कमी किंमतीला मिळाले ते घेऊन आलें. कंटाळा आला कीं ते अंक घेऊन वाचत बसते. दर महिन्याला तुमची एकेक गोष्ट आहे त्याच्यांत.'

'हं.'

'त्या गोष्टी वाचल्यापासून सतत मी तुमचं चित्र माझ्या डोळ्यापुढें रंगवीत असे. तुम्हीं दिसत कसे असाल, हंसत कसे असाल हें कल्पनेनं रंगवीत बसत असे. कधीं काळीं आपली भेट होईल हें स्वप्नांतहि नसतांना– आज अचानक तुम्हीं आलांत.'

तिला झालेला आनंद तिच्या मुद्रेवर स्पष्ट दिसत होता. मघा-पासून छातीवरून ढळलेला पदर तिनें नीट सावरून घेतला. कोनाड्यां-तील उदबत्तीच्या पुड्यांतून तिनें दोन उदबत्त्या काढल्या. त्या पेटवून तिनें साईबाबांच्या तसबीरीखालीं भिंतीला पडलेल्या फटींत अडकविल्या आणि भक्तीभावानें तिनें हात जोडले.

बाहेर पाऊस अजून थांबला नव्हता. थांबण्याची लक्षणेंहि दिसत नव्हतीं.

'आलें हं.'

ती आंत गेली.

थोड्याच वेळांत कपभर दूध घेऊन बाहेर आली.

'मघाशींच जेवलें मी. कांहीं नव्हतं. हें घ्या, नाहीं म्हणूं नका.'

तिनें आर्जवी नजरेनं माझ्याकडे पाहिलं.

मी कप घेतला.

भरल्या नजरेनें ती माझ्याकडेच बघत होती.

'लग्न झालंय् का आपलं ?'

'हो. का ?'

'भाग्यवान् आहे तुमची बायको.'

'कां ?'

'रागावूं नका. मी आपली एक वेडी बोलते आहे. तुमचा हेवा वाटतोय मला कसं सांगूं तुम्हांला मला काय वाटतं तें ? काय सांगूं ?'

ती एकदम गंभीर झाली.

मी सावकाश दुधाचे घुटके घेऊं लागलों.

'खरंच रागवूं नका मी कांहीं बोललें तर. असं होतं कीं कांहीं कांहीं वेळां मनांत दडवून ठेवलेलं सगळं कुणापाशीं तरी सांगून टाकावंसं वाटूं लागतं. कुणाजवळ बोलणार मी ? माझं दुःख कुणाला सांगणार ? माझ्याकडे येणारे सगळे क्षणाच्या सुखासाठीं. त्यांना पाहिजे असतो माझ्या शरीराचा उपभोग. माझ्या मनाची चिंता त्यांना कशी कळणार ? आणि त्यांना मी सांगूं तरी कुठल्या तोंडानें ? मला मदत करायची दूरच राहो उलट ते मलाच हंसतील, वेड्यांत काढतील, तुला सज्जीला हे नाद कशाला म्हणून निर्भर्त्सना करतील; आणि मग माझ्या या दुःखांत आणखी एका दुःखाची भर पडेल. हें मला नको आहे. म्हणून मी आतांपर्यंत कुणाशींहि बोललें नाहीं. बोलणार नव्हतें. परंतु आज मला तें थांबवून ठेवतां येणार नाहीं. निदान तुमच्याकडे तरी.'

'काय झालं ? सांगा ना.'

ती गंभीर झाली होती. उफाळून येणारें दुःख दाबायचा ती प्रयत्न करीत होती. हें स्पष्ट दिसत होतें. खालचा ओठ तिनें दाबला होता.

'काय सांगायचं आहे तुम्हांला ? सांगा ना.' मी म्हणालों.

'जेव्हां जेव्हां मी गोष्टी वाचते तेव्हां तेव्हां वाटूं लागतं कीं मीहि असंच लिहावं. वाटतं खूप खूप लिहावं; खूप खूप वाचावं. जाड्या जाड्या पुस्तकांत मान खुपसून दिवसभर वाचनांत रमून जावं. प्रोफेसरीणीसारखं मुलांच्यापुढें व्याख्यानं द्यावीत. कॉलेजांत जावं अन् खूप शिकावं. परंतु मला कसं शक्य आहे हें ? मी नुसती गुदमरते आहे. या जीवनाला कंटाळले आहे मी. रात्र जवळ येऊं लागली कीं माझ्या पोटांत भीतीचा गोळा उभा राहातो. वाटतं, इथून कुठेंतरी पळून जावं. एकदां मनांत आलं होतं, की मुंबईला जावं. परंतु तिथेंहि काय आमच्या-सारख्यांच्या नशिबीं हाच वनवास येणार ? कॉलेजांत जाऊन शिक्षण घेणं काय सोपं आहे ? कोण मदत करणार मला ?'

'एकट्याच राहातां का इथं ?'

'हो. आई आणि लहान भाऊ राहातात तिथें दूर खेडे.गांवांत. आणि मी त्यांना पैसे पाठविते दर महिन्याला. संसाराची जबाबदारी माथ्यावर पडल्यानंतर माणूस किती दुर्बळ होतो. माझ्या मनाविरुद्ध आज मला हें काम करावें लागत आहे. आईसाठीं, माझ्या धाकट्या भावासाठीं निदान तो तरी चांगला शिकून पुढें येऊं दे, वाईट संस्का-रांच्या सांवलीपासून तो तरी दूर राहूं दे, म्हणून त्याला तिथें ठेवलें आहे; आईकडे. माझं जीवन तर आज जखडलेलंच आहे, निदान त्याचं तरी भलं होऊं दे.'

तिनें डोळ्यांना पदर लावला.

'किती हौस होती मला. मराठी शाळेंत होतें मी. शिकण्यांत अगदीं हुषार नसलें तरी दरवर्षी पास होत होतें. आईनें मावशीकडे ठेवले होतं मला त्यावेळीं. त्यावेळीं वाटायचं मला कीं चांगली बी. ए. होऊन एकाद्या चांगल्या मिळवत्या पुरुषाबरोबर लग्न करून सुखी संसार चालवावा; खूप पुस्तकें विकत घ्यावींत. ते ऑफीसांत गेल्या वेळीं दिवसभर वाचत नाहींतर लिहित बसावं. परंतु सारं चक्र उलटं फिरलं. माझी मावशी वारली. आई आजारी पडली. संसार उघडा पडला. खाण्याची ददात पडली. माझ्या मावशीकडे येणाऱ्या माणसांची नजर माझ्याकडे वळली. ते पाहिजे तितके पैसे देणार होते. माझ्या आईला वाचवणार होते. मला अन्नपाणी मिळणार होतं. फक्त त्यांना माझ्याकडून शरीराचं सुख पाहिजे होतं. आणि...आणि...'

तिचा कंठ दाटून आला.

पुढें तिला बोलवेना.

अनुक्रमणिका






मीहि भारावलों होतों. एका कोंडलेल्या जीवाची धडपड बघत होतों. तिला कसा धीर द्यावा ते मला समजत नव्हतं. मुखस्तंभासारखा मी बघून राहिलों.

—ती उठली आणि आंत गेली.

थोड्याच वेळांत ती कांहीं कागदाचे कपटे घेऊन बाहेर आली. चुडगा माझ्यापुढे करीत म्हणाली,—

'या गोष्टी आहेत; मी लिहिलेल्या. हंसूं नका. माझ्या वेडीच्या मनांत कधीं कधीं वेडेवाकडे विचार येतात ते मी उतरून ठेवतें अशी कागदांवर. तुमच्या गोष्टी वाचतें आणि त्या विचारांना गोष्टींचं रूप देण्याचा प्रयत्न करतें. आजपर्यंत कुणाला दाखविलेलं नाहीं मी. परंतु आतां तुम्हांला दाखविल्याशिवाय रहावत नाहीं मला. वेडंवाकडं असेल परंतु मनापासून लिहिलं आहे मी.'

मी ते कागद हातांत घेतले. मेणचटलेले, तेलाचे डाग पडलेले असे ते कागद मी जुळवून वाचूं लागलों. बाहेर पाऊस नुसता कोसळत होता. ती तिथेंच बसली माझ्या खुर्चीशेजारी, माझ्याकडे तोंड वळवून; माझ्या चेहऱ्याकडे पाहात. आर्त नजरेनें टक लावून पाहात बसली. माझ्या चेहऱ्यावरचे भाव वाचण्यांत दंग झाली.

वर वर चाळूनच मला तिच्या लिखाणाचा दर्जा समजून आला. यथातथाच होतं खरं; परंतु त्याला अनुभवाची धार होती. कांहीं ठिकाणीं नुसतंच स्वप्नरंजन होतं; कांहीं ठिकाणीं सत्याच्या कटुतेचं मार्मिक दर्शन होतं.

कागद वाचून संपविले आणि तिच्या हातांत परत देत मी बोटानें माझे डोळे दाबून घेतले. कंदीलाच्या प्रकाशानें डोळे दुखत होते.

'कसं काय वाटलं ?' उत्सुकतेनं तिनें विचारलं.

तिला निराश न करण्याच्या उद्देशानें मी म्हणालों.



'छान आहे. असंच लिहीत रहा. कथानकांना तुमच्यापाशीं तोटा दिसत नाही. तुम्हीं शैली सुधारली पाहिजे. भाषेच्या दृष्टीनें प्रयत्न केले पाहिजेत.'

तिचे डोळे आनंदानें फुलले. आशेची कारंजी तिथं नाचूं लागलीं.

'मला मदत कराल का ?'

चटकन् तिनें माझे हात धरले.

'काय करूं ?' मी हळूच तिच्या हातांतून हात सोडवून घेत म्हणालों, ' तें तिच्या लक्षांत आलं ती ओशाळली. तिनें माझा हात सोडून दिला.

'कमंहि करा; आणि मला या जोखडांतून मुक्त करा. मला माझं स्वतंत्र अस्तित्व जगूं द्या. मी आयुष्याची ऋणी राहीन तुम्हांला. मला शिकूं द्या. मला माझ्या कर्तृत्वानें पुढें येऊं द्या. कराल कां येवढं ? तुमचं नांव मी जेव्हां जेव्हां वाचे. तुमच्या गोष्टींतून दिसणारं अनाथासाठीं तळमळणारं तुमचं हृदय ओळखे. तेव्हां तेव्हां मला कुणीतरी मित्र, माझा हिंतचिंतक भेटल्याचा भास होई. मनांत मी तुम्हांला कधीच ओळखलें होतें. आज तुम्हीं सामोरे आलांत म्हणून–म्हणून राहवलं नाहीं. सांगा कराल कां एवढं ?

माझ्यासमोर मोठा पेंच पडला. काय सांगावं मला समजलं नाहीं. बाहेरच्या जगांत वेश्येशीं उघड संबंध मी कसा ठेवूं शकलों असतों ? परीटघडीच्या समाजांत माझी नालस्ती झाली असती तिच्याशीं बोलतानांहि मला जर कुणी बघितलं असतं तरी माझं नांव गांवभर दुमदुमलं असतं. शिवाय लताचा काय समज झाला असता ? तिला मी कसा पटवून देऊं शकलों असतों कीं केवळ उदार मनानंच मी या बाईला मदत करीत आहे; शिवाय माझा तिच्याविषयीं अन्य कसलाहि हेतू नाहीं ? उलट तिच्या मनांत जर संशयाचं बीं पेरलं गेलं असतं तर त्यामुळें माझ्या संसारालाच सुरुंग लागणार होता. तो धोका पत्करायला मी तयार नव्हतों. पळवाट काढायच्या हेतूनें मी म्हणालों,

'मला खरंच कौतुक वाटतं तुमचं. अशा परिस्थितीतहि तुम्हीं या साऱ्या कल्पना उराशी बाळगून आहांत. परंतु सत्य परिस्थितीचा कधीं विचार केलांत कां ?'

'काय ?'

'तुम्हांला खूप शिकावसं वाटतं, लिहावसं वाटतं. परंतु तुमच्या आईचं भावाचं काय ? पैसे कोठून आणणार तुम्हीं ? मी मदत करून किती करूं शकेन. पैशांच्या बाबतींत मी दरिद्रीच आहे, एका संसाराला पोसण्याची ताकद कांहीं नाहीं माझ्यांत '

तिचा चेहरा खर्रकन् उतरला. विजेचा झटका बसल्यासारखं तिला झालं.

'म्हणजे ? मला असंच राहावं लागेल ?' स्वतःशींच पुटपुटल्यासारखी ती म्हटली.

मी गप्प राहिलों.

आषाढांतील आकाशासारखे तिचे डोळे भरून आले,






'नांव काय तुमचं ?'

'काशी.'

मी माझी बॅग उघडली. तिच्यांतून माझा नुकताच प्रसिद्ध झालेला कथासंग्रह बाहेर काढला. पहिलें पान उघडून त्याच्यावर तिचं नांव लिहिलं आणि खाली सही करून तिच्याकडे देत म्हटलं,

'हें पुस्तक घ्या. माझी आठवण म्हणून.'

जडावलेल्या हातानें तिनं पुस्तक घेतलं.

'गांवी गेल्यानंतर आणखीं पुस्तकं पाठवून देईन मी तुम्हांला. चांगली चांगलीं, गोष्टी कशा लिहाव्यात, लेख कसे लिहावेत वगैरे.'

तिनें कृतज्ञतेनें माझ्याकडे पाहिलं.

'पाऊस थांबला का ?' मी विचारलें.

तिनें खिडकी उघडून बघितलं. पाऊस थांबला होता. मीं बॅग बंद केली. बूट चढवूं लागलों.

'या काळोखांत चालत जाणार तुम्ही ?'

'हो. कां ?'

'किती वाजले अशी तुमची कल्पना आहे ? नुकताच एक वाजून गेला पोलीस क्वार्टर्सच्या घड्याळांत. अशा वेळीं तुमचं हॉटेल तरी कुठें उघडं असेल ? शिवाय बाहेर चिखल किती भरलाय् ? छे; मी नाहीं जाऊं देणार तुम्हांला.'

माझ्या मुद्रेवरची चलबिचल तिच्या लक्षांत आली.

स्पष्टपणें ती म्हणाली.

'कांहीं घाबरूं नका. निर्धास्तपणें झोपा इथं. नाहीं म्हणूं नका. तुम्हांला देण्यासारखं कांहीं नाहीं माझ्याकडे जे कांहीं आहे ते मोडकं तोडकं, फाटलेलं; फुटलेलं. निदान एका रात्रीपुरता का होईना तुम्हांला आश्रय देण्याचं समाधान मला मिळेल. तें तरी माझ्यापासून हिरावून घेऊं नका. ऐका माझं. कृपा करा.'

—आणि मी बुटाचें बंद परत सोडले.

आज तीन दिवस झाले. काशीचा चेहरा माझ्यासमोर तरळतो आहे. तिच्या तडफडणाऱ्या जिवाचं कसं समाधान करायचं याचा एकसारखा ध्यास लागला आहे. चार पुस्तकं पोस्टानें पाठवून तिचं समाधान होणार नाहीं हें मलाहि माहित आहे. परंतु काय करावं. हें मला अजूनहि सुचेनासं झालं आहे. लिहावयाला बसलों कीं तिचे शब्द आठवतात. तिचे डोळे दिसतात; भावपूर्ण, आशेनें बघणारे. मी बेचैन होतों. पेन हातांतून आपोआप गळून पडतं आणि पुण्याला परत येतांना गाडींत पेटी वाजवत गाणाऱ्या आंधळ्याचे गाणें कानांत घुमूं लागतें आणि मग माझं हृदय रडूं लागतं.

कैदमें है बुलबुल
सैयाद मुस्कराये,
कहाँ भी न जायें चुप रहाँ भी न जायें

• • •

*परिस्थितिनुरूप धर्मांच्या मर्यादा जो ओळखतो तो यशस्वी होतो. असा आदर्श यशस्वी पुरुष म्हणजे श्रीकृष्ण. माणसानें वागूं नये कसें याचा आदर्श युधिष्ठिर. तर माणसानें वागावें कसें याचा आदर्श कृष्ण. आणि कृष्णाचा म्हणून जो धर्म होता तो धर्मच अनुकरणीय आणि जयास्पद होय!*

# आमचा एकांत पाहूं नये

—आत्माराम नीळकंठ




## यतोधर्मस्ततोऽजयाः ४

## जेथें धर्म युधिष्ठिर तेथें अपयश निरंतर

कुलीन स्त्रीची अब्रू हा समाजाच्या अथवा व्यक्तीच्या पौरुषाचा मानदंड आहे. शिशुपाल रुक्मिणीच्या अब्रूचा उद्धार करण्यासाठीं उठला तेव्हां त्याच्या मुखांतून ते अपमानाचे शब्द निघावयाच्या आंतच कृष्णानें त्याचा वध केला. उलट द्रौपदीच्या अब्रूचें धिंडवडे धर्मानें शांतपणें सहन केले. महाभारताचा आस्तिक दृष्टीनें विधायक विचारसुद्धां डोळसपणेंच व्हावयास हवा.

'यतो धर्मस्ततो जयः' (जेथें धर्म तेथें विजय) हें महाभारतांतील सर्वांत फसवें वाक्य आहे. याचा अर्थ लावतांना जागरूक रहावयास हवें. 'यतो कृष्णस्ततो जयः' (जेथें कृष्ण तेथें विजय) या भारतांतीलच सूर्यप्रकाशाइतक्या स्पष्ट वाक्याचा अर्थ जसा मनांत बिंबतो तसा पहिल्या वाक्याचा बिंबत नाहीं.

या वाक्यांतील धर्म शब्दाचा अर्थ संदर्भानें युधिष्ठिर असा लागतो. तो पटणें ही गोष्ट केवळ अशक्य आहे. युधिष्ठिर धर्म हा वस्तुतः युधिपलायन धर्म आहे. युद्धाची गोष्ट सोडूनच द्या. पण इतर जीवनांतसुद्धां युधिष्ठिर जे निर्णय घेतो त्यांतला त्याला जयाकडे नेणारा निर्णय शोधून काढणें कठीण आहे.

जीवनांत आपलें संरक्षण करणारे कोणतेही निर्णय युधिष्ठिर घेऊं शकलेला नाहीं. लाक्षागृहांतून त्याला विदुरानेंच सांभाळून नेलें. बकासूर वधाच्या वेळीं त्याची प्रतिक्रिया भेकडपणाची झाली. द्रौपदी विवाहांत त्याच्या निर्णयानें विवाहाचा विचका होऊन, केवळ द्रौपदी होती म्हणूनच जें पार पडूं शकलें, असें दिव्य द्रौपदीच्या वांट्यास आलें. द्यूत खेळण्याचा त्याचा निर्णय तर विचारूंच नका. द्रौपदीच्या सामर्थ्यानें त्या घोर संकटांतून एकदां सुटका झाल्यावर त्यानेंच पुन्हां वनवासाच्या अटीवर द्यूत खेळण्याचा निर्णय घेतला. घोषयात्रा प्रसंगींचा त्याचा निर्णय, द्रौपदीला जयद्रथानें पळवून नेलें तेव्हांचा त्याचा निर्णय, हे त्याच्या पुढचीं संकटें वाढविणारे ठरले. धर्माचा दूरदृष्टिशून्य आंधळेपणा प्रत्येक वेळीं पायांवर धोंडा पाडून घेणारा निर्णयच घेऊं शकला. आणि हे सारे निर्णय त्यानें मोठ्या उदात्त हेतूनेंच घेतले असावे असें मानणें कठीण आहे. निदान द्यूताचा निर्णय त्यानें दुर्योधनाचें राज्य अपहरण करण्याच्या स्वार्थी हेतूनें घेतला होता हें तो स्वमुखानेंच कबूल करीत आहे.

उलट कृष्ण एकदां स्वच्छ म्हणत आहे. कीं मी त्या ठिकाणीं असतों तर हा द्यूत होऊं दिला नसता. कृष्णाच्या बोलण्यांत काडीचीही अतिशयोक्ति नाहीं. कृष्णानें द्यूत होऊं दिला नसता म्हणजे नसता. यावरून असा प्रश्न येतो कीं, युधिष्ठिराचे वकील म्हणतात त्याप्रमाणें, त्या विशिष्ट परिस्थितींत द्यूत खेळणें हाच जर धर्म होता, तर काय कृष्ण अधर्म करून तो द्यूत टाकणार होता? कृष्ण महाभारताचें दैवत. तो अधर्म करून द्यूत टाळणार होता असें महाभारत म्हणूं धजणार नाहीं. अर्थात कृष्ण धर्मानेंच द्यूत टाळूं शकला असता. द्यूत टाळणें आणि धर्म पाळणें या दोन्ही गोष्टी शक्य होत्या पण त्या कोणाला? कृष्णाला. त्याला व्यवहारज्ञानाची जरूर होती. त्याचा युधिष्ठिराच्या ठायीं संपूर्ण अभाव होता. असा व्यवहारशून्य माणूस कोणताहि निर्णय घेऊं शकणें आणि भारतीय युद्धासारखी जगड्व्याळ गोष्ट यशाप्रत नेऊं शकणें ही गोष्ट कशी संभवनीय आहे बरें? त्यामुळें धर्म म्हणजे युधिष्ठिर मानला तर जेथें धर्म तेथें विजय' हें वाक्य अर्थशून्य होतें. तें जेथें धर्म तेथें पराजय (यतो धर्मस्ततोऽजयः) असें हवें

पण याचा दुसरा अर्थ संभवतो. धर्म म्हणजे तरी काय? भेकडता लपविण्यासाठीं केलेल्या

तत्त्वज्ञानाच्या अवडंबरांतून जन्म पावलेलीं युधिष्ठिराचीं मतें याला धर्म कशासाठीं म्हणावें ? जो धारणा करतो तो धर्म. अडचणींतून मार्ग दाखवितो तो धर्म. संकटांतून जो सोडवतो तो धर्म. प्रत्यक्ष कृष्ण हाच मूर्त धर्म.

वर आपण पाहिलें. कृष्ण धर्मादि राखणार होता आणि द्यूतही टाळणार होता. त्यावरून धर्म हा परिस्थितीनिरपेक्ष नाहीं ही गोष्ट सिद्ध होते. जो युधिष्ठिरास धर्म वाटला तो कृष्णास धर्म वाटत नाहीं. युधिष्ठिराचा धर्म हा त्रिकाल-बाधित चिरंतन ठोकळ्यासारख्या स्थूल स्वरूपाचा होता. कृष्णाचा धर्म सापेक्ष होता. ब्राह्मणाचा धर्म वेगळा, क्षत्रियाचा वेगळा; राजाचा वेगळा, प्रजेचा वेगळा; युद्धाचा धर्म वेगळा, तहाचा वेगळा; दौत्याचा वेगळा; द्यूताचा वेगळा असेंच मानावयास हवें. मानवाचा म्हणून कांहीं समान धर्म अर्थातच आहे. पण सर्व लोकांना सर्व कालीं चालूं शकेल असा एकच धर्म असणें अशक्य आहे. मानवधर्म हा जरी पाया असला तरी त्यावर बांधावयाच्या इमारतीचें आकारमान रंगरूप हें परिस्थितिप्रमाणें बदलणें हाच व्यवहार्य धर्म आहे. जो संकटांत पाडतो तो धर्म होऊंच शकत नाहीं. कारण संकटांतून तारणारा तो धर्म अशी धर्माची व्याख्या आहे. ज्याना इहलोकींचें जीवन व्यवस्थित चालवितां येत नाहीं. त्याना परलोकींच्या जीवनात यश मिळेल असें मानण्यात दुर्बलाच्या आधळ्या समाधानाशिवाय काहींच अर्थ नाहीं. धर्म हा इहलोकाही धारणा करणारा हवाच. मानवधर्म आणि व्यक्तिधर्म याच्या मर्यादा जो कृष्णाप्रमाणें कौशल्यानें सांधतो तोच यशस्वी होतो. युधिष्ठिराच्या धर्मामध्यें केवळ मानव धर्माचा पायाच होता. त्यावर इमारत अशी नव्हतीच. नुसता पायाच स्वर्गापर्यंत उंच बांधून त्यांत रहाणारा माणूस सदेह स्वर्गात गेला तरी त्याचें ऊना पावसापासून रक्षण कसें होणार ? असा माणूस व्यवहारशून्य होय. वेडा होय. त्याज्य होय. त्याला जय मिळणें अशक्य आहे.

परिस्थितिनुरूप धर्माच्या मर्यादा जो ओळखतो तो यशस्वी होतो. असा आदर्श यशस्वी पुरुष म्हणजे श्रीकृष्ण. माणसानें वागूं नये कसें याचा आदर्श युधिष्ठिर. तर माणसानें वागावें कसें याचा आदर्श कृष्ण. आणि कृष्णाचा म्हणून जो धर्म होता तो धर्मच अनुकरणीय आणि जयास्पद होय.

या धर्माचें संपूर्ण विवेचन करणें सामान्य माणसाच्या कुवतीबाहेरचें होय. जशास तसें (ये यथा मां प्रपद्यन्ते तान् तथैव भजाम्यहम्) हा एक या धर्माचा मोठा भाग आहे. (आततायिनं आयान्तं हन्यात एव) कुरापतखोर हल्लेखोराला ठार कराच करा; (दुष्कृतां विनाशायच) दुष्टांना दंड कराच करा; हाच तो धर्म. शिखंडी आडून बाण मारणें, द्रोणाशीं असत्य बोलणें, कर्णाला अडचणींत पकडणें, दुर्योधनाची मांडी तोडणें या साऱ्या गोष्टी त्या धर्मात बसतात. कारण एकदां युद्धाला तोंड लागलें म्हणजे आपण जो धर्म पाळावयाचा असतो तो मानवधर्म नसून युद्धधर्म होय. कृष्णानें हा युद्धधर्म पाळला म्हणूनच तो यशस्वी झाला. मानवधर्माचा विचार करावयाची अखेरची मर्यादा युद्ध करावें कीं नाहीं याचा निर्णय घेण्याच्या अखेरच्या क्षणापर्यंतच आहे. युद्ध करावें असें एकदां ठरलें कीं मग हें युद्ध युद्धधर्मानेंच व्हावयास हवें. युधिष्ठिराला धर्मयुद्धानें युद्ध करावयाचें होतें. धर्मयुद्धानें युद्ध करून कधींच जय न मिळता. कृष्णानें युद्धधर्मानें युद्ध केलें आणि जय मिळविला. धर्मयुद्ध आणि युद्धधर्म यांत दोन ध्रुवाचें अंतर आहे. यांत साऱ्या जगाची उलटापालट झाली आहे. युद्धांत धर्मयुद्धानें जय मिळणें शक्य नसतें तो युद्धधर्मानेंच मिळूं शकेल.

ज्या ठिकाणीं कृष्ण आहे, त्याठिकाणीं युद्धआहे त्याठिकाणीं जय आहे. जेथें युधिष्ठिर आहे, तेथें धर्मयुद्ध आहे, तेथें पराजय आहे. म्हणून यतो कृष्णस्ततो जयः याचा अर्थ जेथें कृष्ण आहे तेथें जय आहे. जेथें युद्धधर्म तेथें जय आहे असाच घ्यावयास हवा. तरच आपण या व्यवहारवेदांतून व्यवहार शिकूंच शकूं.



## राज्यं कुरूणाम् अनुपूर्वभोज्यम् : ५

## हें राज्य वडिलांचें आहे

भारतीय युद्ध हें युधिष्ठिराला वडिलार्जित राज्याचा हक्क प्राप्त व्हावा म्हणून घडलें असें आपण समजतों. परंतु या राज्यावर युधिष्ठिराचा अधिकार काय हा प्रश्न महाभारतानें मुळींच सोडविलेला नाहीं.

धृतराष्ट्र जिवंत असतां जेव्हां त्याच्या अंधपणाचा फायदा घेऊन दुर्योधन त्याला धुडकावून लावतो व स्वतः निर्णय घेत असतो तेव्हां गांधारी त्याला म्हणते 'राज्यं कुरूणाम् अनुपूर्व भोज्यम् ॥ उ० १४८३०॥. याचा अर्थ जोपर्यंत वडील माणूस जिवंत आहे तोवर धाकट्याचा राज्यावर अधिकार नाहीं. हा निर्णय धर्म आणि दुर्योधन यांच्या वादांतील नव्हे. तर दुर्योधन आणि धृतराष्ट्र यांमधें आहे. अर्थात यांत पक्षपात नाहीं हें उघड आहे. एवढेंच नव्हे तर सनातन परंपरेला हा निर्णय धरून आहे. पांडवांच्या पूर्वीपासून शेकडों वर्षे अशीच रीत होती. पांडवांनंतर आज हजारों वर्षे अशीच रीत आहे. राज्य हें वडीलकीच्या परंपरेनें चालत असतें एवढेंच नव्हे, तर त्याचे वांटेहि केले जात नाहींत हें ध्यानांत ठेवावयास हवें.

या परंपरेला अपवाद कुरुकुलामधेंच आहेत. ययातीनें आपल्या चार पुत्रांनी अप्रिय







बर्तन केल्यामुळें, त्यांना आपल्या हयातींत व स्वतःच्या अधिकारांत राज्याला अनधिकारी ठरवून शेवटचा मुलगा पुरू याला अधिकार दिले. शकुंतलेचा पुत्र भरत यानें आपल्या नवू पुत्रांना ते नालायक म्हणून ठार मारवून दहावा पुत्र भुमन्यू यास राज्य दिलें. प्रतीपाचा मोठा पुत्र देवापी हा महारोग झाल्यानें स्वखुशीनें राज्यत्याग करून वनांत गेला आणि धाकटा शंतनू राजा झाला. खुद्द शंतनूचा मोठा पुत्र भीष्म यानेहि स्वखुशीनें आपलें राज्य धाकटा भाऊ विचित्रवीर्य यास दिलें.

धृतराष्ट्र आणि पंडू यांचा विचार करतां अशी कोणतीहि गोष्ट झालेली दिसत नाहीं कीं जीमुळें परंपरा मोडून धाकटा भाऊ पंडू, राज्यास अधिकारी व्हावा आणि मोठा भाऊ धृतराष्ट्र राज्यास मुकावा. पित्यानें धृतराष्ट्रास अनधिकारी ठरविलेलें नाहीं. स्वतः धृत-राष्ट्रानेंही स्वखुशीनें राज्याचा त्याग केलेला नाही.

धृतराष्ट्र आंधळा म्हणून राज्यास अन-धिकारी म्हणावें तर प्रथमतः हे कितपत सयुक्तिक आहे ? आंधळा मनुष्य दुसऱ्याकडून कारभार करवून घेऊं शकतो. त्याला अधि-कारवंचित करावयाचें म्हटलें तर त्याच कारणासाठीं बालराजा वा वृद्धराजा यांना अधिकारवंचित करावें लागेल. पण तें न्याय्य मानलें जाणार नाहीं. देवापीचा महारोग आणि आंधळेपणा यांत फरक आहे. महारोग्यानें गृहलक्ष्मीस आलिंगन देणें आपणास प्रशस्त वाटणार नाहीं पण आंधळ्यानें तसें देणें यांत आपणास गैर वाटणार नाहीं. गृहलक्ष्मी आणि राज्यलक्ष्मी यांत या दृष्टीनें फरक करावयास नको. शिवाय पंडूहि श्वेतकुष्ट किंवा अशाच कसल्यातरी व्यंगानं पीडिलेला नव्हता काय ?

महाभारतांत याविषयीं जो प्रत्यक्ष श्लोक आहे तो मोघम आहे. धृतराष्ट्र अनधिकारी झाला व पांडूस अभिषेक झाला असें स्पष्ट वाक्य महाभारताच्या गाभ्यांत नाहीं. तर आंधळेपणानें धृतराष्ट्रास राज्य लाभलें नाहीं व पंडू राजा झाला असा उल्लेख आहे. एकंदरीत मागील पुढील घटना पाहतां याचा अर्थ असा आहे की धृतराष्ट्र हा आंधळा असल्यानें त्यांला राज्याचा नीट उपभोग घेतां आला नाहीं व पंडू हाच कारभार पहाणारा झाला. ही गोष्ट सर्वथैव संभवनीय आणि इष्ट आहे.

याला अप्रत्यक्ष पुरावा असा कीं जर धृतराष्ट्र हा राजाही नसेल व आंधळा असेल तर त्याला कोणता बाप आपली धडधाकट निर्दोष मुलगी बायको म्हणून देईल आणि कशासाठीं ? ज्याअर्थीं गांधारी ही सर्वगुणसंपन्न आणि निर्दोष कांता त्याला लाभली त्याअर्थीं त्याचा अंधत्वाचा दोष हा राज्याधिकारामुळें न्यून असा ठरला असला पाहिजे. शिवाय धृतराष्ट्राचा अंधपणा त्याला संपूर्ण नालायक बनविणारा नव्हता. धृतराष्ट्र वेद, वेदांग, इतिहास, पुराण, नीतिशास्त्र शिकला होताच पण त्याजबरोबर धनुष्याचा उपयोग, घोड्यावर बसणें, गदायुद्ध, तरवार चालवणें हें आपल्या कामापुरतें शिकला होता. ( आ. १०८/१९ )

यानंतरचा अत्यंत महत्वाचा प्रत्यक्ष पुरावा म्हणजे पांडूनें दिग्विजय करून धन संपादन केलें आणि त्या धनानें धृतराष्ट्रानें अश्वमेध यज्ञ केला हा होय ( आ. ११३/५ ) याचा स्पष्ट अर्थ असा आहे कीं पंडू कारभार करीत होता आणि धृतराष्ट्र हा सिंहासनावर अधिकारी राजा होता.

जर पंडू हा अधिकारी राजा असता तर तो राज्य सोडून वीस वर्षे वनांत गेला तेव्हां राज्याची व्यवस्था काय बरें ? त्यावेळीं धृतराष्ट्राला अभिषेक केल्याचा उल्लेख कुठेंहि नाहीं. आणि जर धृतराष्ट्र पूर्वी आंधळेपणानें अनाधिकारी ठरला असेल तर तो आतां अधिकारी कसा ठरू शकेल ?

पंडू वनांत गेल्यावर सोडा; पण पंडू मेल्या-वर तरी धृतराष्ट्रास अभिषेक झालेला आहे काय ? नाहीं. मग या सर्व कालात धृतराष्ट्र हस्तिनापुरांत राजा म्हणून आहे तो कसा ? पंडू जिवंत असतांनाच धृतराष्ट्राचा राजा, महिपति असा उल्लेख होतो तो कसा ? याचा एकच अर्थ आहे. धृतराष्ट्र हाच राजा आहे. पंडू असतांना पडूं कारभार चालवीत आहे. तो गेल्यावर भीष्म कारभार चालवीत आहे.

अर्थात पांडू हा समर्थ असल्यानें तो आपली उचलबांगडी करील कीं काय अशी धृतराष्ट्रास भीती वाटत असते. पुढील पिढींत तरी आपला दुबळेपणा जाणार आहे की पाडूकडेच सत्ता रहाणार आहे ही चिंता त्याला जाळीत असते. त्यामुळें दुर्योधनाचा जन्म होतांच धृतराष्ट्रानें प्रश्न केला माझ्यामागें हा माझा मोठा मुलगा राजा होईल ना ? ( कीं पांडू सत्तेच्या बळावर युधिष्ठिराला राज्य देणार आहे ? )

पंडूला मुलें होणार नाहींत ही गोष्ट जाहीर होती. पुढें जीं मुलें कुंतीला झालीं तीं कुणा-पासून झाली हें माहीत असलें तरी त्या कुणा-च्यातरी संततीचा हस्तिनापूरच्या राज्यावर अधिकार काय ? खुद्द पंडूचाच अधिकार जिथें नाहीं तिथें या अवैध संततीचा अधिकार कोठून आणि धृतराष्ट्राला औरस मुलें असतां त्यानें तो कसा मान्य करावा ?

तत्कालीन पद्धतीप्रमाणें नियोगानें झालेल्या क्षेत्रज पुत्रांना अधिकार होता हें खरें. पण नियोग म्हणजे व्यभिचार नव्हे. नियोगालाहि कायदे होते. कुलच्छेद टाळण्यासाठीं नियोग हा आपद्धर्म होता. आणि या नियोगाचा

अनुक्रमणिका

अधिकार दिराला होता. दीर किंवा देवर द्वितीय वर असून वराच्या गैरहजेरींत तोच घराचें काम करण्याला पहिला अधिकारी होता. कुंतीनें धृतराष्ट्राकडून अगर विदुराकडून मुलें उत्पन्न करून घेतलीं असतीं तर तीं नियोयानें न्याय्य ठरतीं. पण हे अधिकारी पुरुष जिवंत असतां भलत्यानें उत्पन्न केलेलीं मुलें ही नियोगानें अधिकारी होऊं शकत नाहींत. पंडूचा राज्यावर नसलेला अधिकार त्यांना लाभत नाहींच पण घरांत राहून खाण्यापिण्याच्या व कुलाचें नांव सांगण्याच्या अधिकारासहि ते मुकतात. कुरु आणि कौरव या शिव्या नव्हेत. पवित्र नांवें आहेत. पंडुपुत्रांचें नांव बदलून पांडव हें जें नवें कुलनाम इथून चालू होतें त्याला हेंच कारण असावें.

त्यामुळें हस्तिनापुरच्या परंपरेने चालणाऱ्या राज्यावर पांडवांचा काडिमात्र अधिकार नव्हता. आतां इंद्रप्रस्थाच्या राज्याचा विचार करावयाचा. कृष्णानें ज्याप्रमाणें मथुरा सोडून द्वारकेचें स्वतंत्र राज्य स्थापिलें त्याप्रमाणें धर्मानें हस्तिनापुराच्या कक्षेबाहेर स्वतंत्र राज्य स्थापिलें असतें तर मग कटकट उरली नसती. पण ही धडाडी धर्माला नव्हती. शेपूट घालून त्याच गवाणीच्या आसऱ्याला धडपडणाऱ्या श्वानाप्रमाणें त्याची स्थिति होती. त्यामुळें भीष्म आणि विदुर यांच्या जोरामुळें नाइलाज म्हणून आपल्या राज्याचा जो वांटा त्याला धृतराष्ट्रानें दिला त्यालाच तो चिकटून राहिला. राज्याची वांटणी करणें ही परंपरा नव्हती. ही वांटणी झाली तेव्हां दुर्योधन असमर्थ होता. तो वयांत आला तेव्हां आपल्याच भूमींत वैभव भोगणारे हे लोक त्याला बघवेनात. तो हाडाचा राजा होता. शत्रूचें वैभव बघणें त्याच्या अमर्षशील मनाला शक्य नव्हतें म्हणून त्यानें कुरापतीस सुरवात केली हा सात्त्विकपणा नव्हे. पण दुर्योधन आपणास कोणी सात्वीक म्हणावें अशी अपेक्षा करीत नाहीं. राज्याची वांटणी करण्याची परंपरा नाहीं आणि ही वांटणी आपल्या संमतीशिवाय झाली आहे असें त्याचें मत आहे. तो दुष्ट माणूस आहे हें शतवार मान्य केलें तरी त्याच्या म्हणण्याला कांहीं अर्थ आहे हेंहि मान्य करावयास हवें.

हस्तिनापुरावर पांडवाचा अधिकार नव्हता यांत शंका कांहींहि नाहीं. वनांतून आल्यावर बापाचा कारभारीपणा युधिष्ठिरास हवासा वाटला; तो दुर्योधनानें धुडकावून लावला हें न्याय्यच आहे. मुलगा कर्ता झाल्यावर कारभाऱ्याच्या मुलाची लुडबुड तो कां सहन करील ? दुर्योधनानें इंद्रप्रस्थाचें राज्य बळकावलें त्यालाहि त्याचीं कारणें आहेतच. तीं सात्वीक नसतील पण निरर्थकहि नाहींत.

त्यामुळें भारतीय युद्ध हें राज्यासाठीं लढलें गेलें अशी असलेली प्रामुख्यानें युधिष्ठिराची भूमिका हृद्य वाटत नाहीं. तर तें द्रौपदीच्या अपमानाचा बदला घेण्यासाठीं, तिचे पवित्र केस दुःशासनाच्या रक्तांत भिजविण्यासाठीं लढलें गेलें ही द्रौपदी कृष्णादिकाचीं भूमिकाच मनाला पटते.

याठिकाणी एका गोष्टीचा अवश्य उल्लेख करावा. द्यूतप्रसंगी भावी अनर्थाला भिऊन द्रौपदीला धृतराष्ट्र वर देतो तेव्हां ती तेजस्विनी फक्त आपल्या पतींचें स्वातंत्र्य मागून घेते. आणि तेंही आपल्या पुत्रांस दासपुत्र हा कलंक लागूं नये म्हणून. धृतराष्ट्र राज्य घे म्हणून सांगत असतांहि ती तें घेत नाहीं. युधिष्ठिरास याच्या शतांशानेहि बुद्धि असती तर !

---

# द्रौपद्या नः सहासीनान् : ६

## आमचा एकांत पाहूं नये

अर्जुनानें पराक्रम करून द्रौपदी जिंकिली खरी. पण त्याला ती कांता म्हणून फारशी लाभली नाहीं ! द्रौपदीच्या विवाहानंतर अर्जुनाच्या वांट्याला आला तो वनवास.

या वनवासासाठीं महाभारतांत जीं कारणें दिलीं आहेत तीं विनोदी दिसतात. महाभारताचें कथन जनमेजयासमोर झालेलें असल्यानें त्याच्या पूर्वजांची येनकेनप्रकारेण स्तुती करणें सौतीला अपरिहार्य होतें. पण हा अपरिहार्य तोंडपुजेपणा सोडला कीं महाभारतांत अनेक गमती दिसतात. त्यांतील एक गंमत म्हणजे अर्जुनाच्या वनवासाचीं कारणें.

हीं कारणें अशीं. एका ब्राह्मणाचें चोरापासून रक्षण करण्यासाठीं अर्जुनास हत्यार पाहिजे असतें. हे हत्यार ज्या ठिकाणी असतें तेथें युधिष्ठिर द्रौपदीशीं एकांत करीत असतो. अशा एकांतांत अर्जुनाला तो दिसल्यानें अर्जुन वनांत जातो. कारण पूर्वीच ठरलेलें असतें कीं द्रौपदीशीं एकाद्या पतीचा चाललेला एकांत कुणी दुसऱ्या पतीनें पाहिला तर त्यानें वनांत जावें.

महाभारत हें प्रश्नोत्तर रूप आहे. नको त्या ठिकाणीं चौकस प्रश्न करून महाभारताचा निस्तार अकारण एक लक्ष श्लोकांपर्यंत वाढविणारे युधिष्ठिर आणि जनमेजय जिथें धोका असेल अशा मोक्याच्या जागीं आपला चौकसपणा विसरतात याचें उत्तम उदाहरण वरील खुलासा होय. जनमेजयाचें प्रश्नपाटव लक्षांत घेतां त्यानें खरें म्हणजे या प्रसंगीं पुढील प्रश्न विचारावयास हवे,

" पांडवांचे भिक्षा मागण्याचे दिवस आतां संपलेले असतात. ते इंद्रप्रस्थ राजधानीमधें रहात असतात. या ठिकाणीं त्यांच्या रहाण्याची जागा केवढी असते ! हे राजे लोक. ते का एकाच घरांत रहातात ! बरें एकाच घरांत रहात असले तर तें घर केवढें असतें ! त्यांत का आधुनिक जोडखोलीप्रमाणें दोनच खोल्या असतात ! शयनासन, बायको, हत्यारें आणि एक नवरा यांना आंतल्या खोलींत ठेवून बाकीचे चार नवरे काय बाहेरच्या खोलींत असतात ! अशा या योजनेमध्यें युधिष्ठिर का दिवसा द्रौपदीसमाग करीत असतो ! ज्या ठिकाणीं साठ लक्ष दासी आहेत, साठ हजार ऋषि जेवत आहेत, दहशीं हजार स्नातक सहकुटुंब आराम करीत आहेत, त्या या पांडवाच्या घरामध्यें अर्जुनाची तरवार आणि धर्माचा पलंग यांना एकच खोली मिळाली काय ! बरें पांडवांकडे आतां हत्यारें किती होतीं ! त्यांचें कांहीं शस्त्रागार वगैरे होतें कीं नाहीं ! अर्जुनाचा रथ शस्त्रांनी भरलेला होता कीं नाहीं ! कीं तो युधिष्ठिराच्या पलंगास बांधलेला होता ? यःकश्चित चोरास मारण्यासाठीं या राजांकडे दुसरा कोणी सेवक, सैनिक, सेनापती होता कीं नाहीं !' असे शतशः प्रश्न या खुलाशांतून उत्पन्न होतात.

द्रौपदीची वांटणी कशी केली याबद्दल नीलकंठी प्रतींत ( ही प्रत आपण प्रमाण मानतों ) कांहीं खुलासा नाहीं. दाक्षिणात्य प्रतींत ही

[ पान ५६ वर ]









मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास






# महाराष्ट्र राज्याच्या दुसऱ्या




— पां. वा. गाउगीळ

तसें म्हटलें तर नियोजन सुरू झाल्यापासून साऱ्या भारताची गेल्या बारा वर्षांतील स्वातंत्र्यकालांत जी प्रगति झाली तिचा हिस्सा महाराष्ट्राच्या वाट्यांला कांही प्रमाणांत आलाच आहे. शेती, उद्योगधंदे, वाहतूक, रोजगारी, आरोग्य, राहण्याच्या जागा, शिक्षण या सर्वांत पुष्कळच वाढ झाली आहे. किंमती वाढलेल्या असूनहि वरील सर्व क्षेत्रांत वाढ झाली आहे हे लक्षांत ठेवले पाहिजे. पण लोकांना आपण अधिक सुखी झालो आहो असे वाटत नाहीं, त्यांच्यांत असंतोष वाढलेला आहे, हेवेदावे, स्पर्धा, हाडवैर यांचीहि वाढ झालीं आहे; याचे कारण असे कीं लोकसंख्या अमर्याद वाढत असून लोकशाही हक्कांच्या जाणीवेने लोकांच्या सुखाकांक्षाही वाढल्या आहेत व थोर पुढारी अथवा थोर तत्त्वे यावरील लोकांची निष्ठा घटली आहे. स्वातंत्र्य लढ्याच्या काळांतले अनेक थोर, स्वार्थत्यागी, ध्येयवादी नेते सूख, वैभव, मानसन्मान यामागे धांवत आहेत, यामुळे जनतेला या लोकांच्या संबंधाने किळस निर्माण झालेली असून उच्च नैतिक मूल्ये ही निव्वळ ढोंगबाजी आहे असे जनतेला वाटू लागले आहे. साहजिकच उच्च नैतिक मूल्ये पाळणारा माणूसही अवमानित होत असल्याने समाजांची एकंदर नैतिक पातळी खालावत असल्याचा देखावा दिसत आहे. स्वातंत्र्यप्राप्तीने नैतिक मूल्ये उंचावावी अशी अपेक्षा असते पण प्रकार झाला आहे तो याच्या अगदी उलटा आहे. स्वातंत्र्य प्राप्त होऊन १४ वर्षें झाली तरी महाराष्ट्रराज्य जन्माला येऊन दोनच वर्षें झाली आहेत. या दोन वर्षांपूर्वीच्या बारा वर्षांत महाराष्ट्राचा प्रदेश ९ वर्षेपर्यंत त्रिखंड विभागलेला होता. आणि त्या तीनही ठिकाणी त्याची कुचंबणाच चालू होती. राज्यकर्त्या गटांत महाराष्ट्रीय हे नेहमी दुबळे, दुसऱ्या गटापुढें मिनतवारीने वागणारे, कांहींसे मागासलेले व वैयक्तिक स्वार्थाच्या लालूचीने स्वप्रदेश हिताकडे दुर्लक्ष करणारे होते. यामुळे महाराष्ट्राविरुद्ध पक्षपात फार झाला, १९५६ च्या नोव्हेंबरात महाद्विभाषिक आले व मुख्यमंत्रिपद महाराष्ट्राकडे आले. त्यानंतर दोन महत्त्वाच्या घटना घडल्या. विदर्भ, मराठवाडा व पश्चिम महाराष्ट्र हे शेकडो वर्षें निरनिराळ्या राजवटीखाली नांदलेले प्रदेश एका राजवटीत आलें, आणि भाषा एक असूनसुद्धां शेकडो वर्षांच्या विभक्तपणामुळे जी भावनिक पृथकता या तीन्ही प्रदेशात आली होती ती नष्ट होऊन भावनिक ऐक्य निर्माण होण्यास सुरवात झाली. दुसरी अधिक गोष्ट घडली ती म्हणजे राज्यकर्त्या पक्षातील महाराष्ट्र गट लोकमताच्या प्रखर दडपणामुळे दुसऱ्या म्हणजे गुजराती गटाशी अंशतः बरोबरीच्या नात्याने वागू लागला. अन्यायाविरुद्ध झगडू लागला व या गटस्पर्धेत द्विभाषिक नांदणे अशक्य होऊन महाराष्ट्र राज्य जन्माला आले. महाराष्ट्राचे भाषिकराज्य ही शिवाजी महाराजांच्या राज्याभिषेकानंतरची महाराष्ट्राच्या जीवनांतली तितकीच मोठी घटना होय.

× × ×

महाराष्ट्र राज्यनिर्माण होण्याचे ठरल्यापासून महाराष्ट्राच्या राज्यकर्त्यांनी विकास प्रयत्नाची कामे हाती घेण्यास सुरवात केली. पण महाराष्ट्र राज्यनिर्मितीपासून दुश्चिन्हाची मोठी परंपरा सुरू झाली. काळोख्यारात्री घुबडाचा सूर ऐकू यावा त्याप्रमाणें आतां महाराष्ट्रांत मराठी राज्य होणार कीं मराठा राज्य होणार ?' असा अपशकुनी प्रश्न एका प्रख्यात लेखकाने उपस्थित केला. विदर्भांत मूठभर लोकांनी पृथकविदर्भाची चळवळ जाळपोळीच्या व दंगलीच्या मार्गाने चालू केली. निसर्गाहि या सरकारविरोधी कटात सामील झाला दक्षिण कोंकणांत भयंकर वादळ होऊन कित्येक लक्ष रुपयांचे नुकसान झाले. पुण्यास पानशेत व खडकवासला ही धरणे फुटून जो अनर्थ झाला त्यांत कांही कोटि रुपयांचे नुकसान झाले इतकेच नव्हे तर मानवी दुःख व आपत्ति यांची परमावधि झाली. विदर्भांतहि जागोजाग महापूर येऊन कित्येक खेडी साफ उध्वस्त झाली. नवीन प्रगतिप्रयत्नांच्या सुरवातीलाच हे मोठे आघात झाल्यामुळे आधींच आर्थिक



अनुक्रमणिका

दृष्ट्या मागासलेल्या पण बौद्धिकदृष्ट्या अति जागृत व भांडखोर अशा या महाराष्ट्रप्रदेशांत वृत्तपत्रे व सार्वजनिक व्यासपीठे यांत शिव्याशाप, अपशब्द यांच्याच फैरी ऐकूं येतात आणि या सर्व मारगिरीचा विषय मुख्यमंत्री यशवंतराव चव्हाण व त्यांचे सहकारी हे झाले आहेत. निवडणुका संपवून व त्यांचे निर्णय लागून तीन आठवडे झाले असतांना हा लेख मी लिहीत आहे. ज्यांनी शिव्यागाळ्यांचा अगदी अग्निवर्षाव केला ते सारे फार मोठ्या प्रमाणांत पराभूत झाले असल्याने त्यांच्या तोंडाला तूर्त थोडीतरी खिळ बसलेली दिसते. गेल्या दोन वर्षांत प्रगति प्रयत्न जे सुरू झाले त्यांच्या जोडीला त्याच काळांत वर उल्लेखिल्याप्रमाणे घडलेले अनर्थ आणि भावनातेढीची वाढलेली कटुता पाहिली म्हणजे गेल्या दोन वर्षांच्या भावनिक व आर्थिक अशा दोन्ही जमाखर्चांत जमेऐवजी बरीच तूट आलेलीच दिसते. पण सूक्ष्म दृष्टीने सभोवती नजर टाकल्यास व जनमनाचा कानोसा घेतल्यास, आज लाभ दिसत नसला तरी भावि लाभाचा पाया फार चांगल्या प्रकारे घातला जात आहे असा विश्वास वाटतो. व्यासपीठे व वृत्तपत्रें गेली कांहीं वर्षे नुसती शिव्यांनी गरजली. पण लोकमानसावर दोन अडीच वर्षांपूर्वी या शिव्याशापांचा जो परिणाम झाला होता तो गेल्या दोन वर्षांत तसा राहिला नाहीं.

महाराष्ट्रांत गेल्या ४–५ वर्षांत मुख्यमंत्री चव्हाण यांच्या रूपाने एक नवे नेतृत्व अवतरलें आहे. वृत्तपत्रांत जाड मथळे देऊन माणसे पुढारी बनविली जातात आणि पुढारपणावरून खाली पाडली जातात. पावसाळ्यानंतर उकिरड्यावर उगवणाऱ्या शोभिवंत छत्र्यांचे उदयास्त जितके जलद होतात तितके जलद उदयास्त दरसाल अनेक पुढाऱ्यांचे झाले आहेत. पण यशवंतराव चव्हाण याहून वेगळे आहेत.

* * *

यशवंतराव चव्हाण अचानक व अज्ञातांतून पुढें आहे खरें आहे. पण एकादा पुढें आल्यापासून त्यांनी आपले पद टिकविले आहे. वृत्तपत्रांनीं त्यांना पुढें आणले नाहीं. उलट एकदा पुढें आल्यावर वृत्तपत्रांनीं त्यांना पाडण्याची शिकस्त केली, पण ते कोसळले नाहींत. महाराष्ट्राच्या अलिकडील इतिहासांत विरोधकाकडून व प्रतिकूल परिस्थितीकडून जेवढा छळ यशवंतरावांना सोसावा लागला तेवढा दुसऱ्या कोणत्याही पुढाऱ्याला सोसावा लागला नाहीं. पण त्यांची खंबीरी वाढत गेली व लोकमताचा स्थिर व दृढ पाठिंबा त्यांच्या मागे वाढतच गेली. ही गोष्ट अद्वितीय अशीच झाली. हा निव्वळ चमत्कार नव्हे. त्याला कारणें आहेत. यशवंतरावांचे पूर्ण आयुष्य प्रखर स्वातंत्र्य लढ्यांत गेले. पण वैय्यक्तिक महत्त्वाकांक्षेमागे न लागता त्यांनीं पक्षशिस्त पाळली, ज्या जागेवर सहज जाता आले तेथें जाऊन त्या जागेचे काम करीत ते राहिले, अमुक विषयात तज्ज्ञता अशी त्यांनी मिळविली नाही, पण सामाजिक आर्थिक, राजकीय वाचन सतत चालू ठेवले. त्यांनी जिव्हाळ्याचे मित्र मिळविले, पण कधीही गट स्थापला नाहीं. मुख्यमंत्री होण्यापूर्वी नेहरूंशी त्यांचा परिचयहि नसेल. पण नेहरू, पटेल व गांधी यांच्या संमिश्र विचारसरणीशी यशवंतराव साक्ष्य पावले होते. यशवंतराव कॉ. रॉय यांच्या गटांत कांहीं काळ होते. पण ते रॉय यांची शास्त्रशुद्ध विचारसरणी शिकते तरी कॉंग्रेसच्या वरील त्रिमूर्तीपासून मनाने कधीच गेले नाहींत. मुख्यमंत्री होण्यापूर्वी त्यांचे वय अवघे त्रेचाळीस वर्षांचे होतें. त्यावेळी व त्यापूर्वी पुढे येण्यासाठी ते धडपडले नाहींत. त्यांना महत्त्वाकांक्षा नव्हतीच, पण आत्मविश्वासही कमी असावा असा माझा तर्क आहे. कारण महाराष्ट्राच्या हिताच्या कांहीं प्रश्नात जिद्दीने दृढ भूमिका घेण्याचे कांहीं प्रसंग आले असतां यशवंतराव त्या त्या वेळीं पुढें आले नाहींत. पण उलट त्यांनीं दुटप्पीपणा अथवा खोटा देखावाही कधीं केला नाहीं. यशवंतराव हे असोल्या नारळासारखे दुर्भेद्य व गूढच होते. यामुळें यशवंतरावांचा माझा १९४६ पासून परिचय असूनहि त्यांचा स्वभाव अथवा गुणविशेष मला कधींच अजमावता आले नाहींत. मुख्यमंत्रिपदाची हाव अथवा महत्त्वाकांक्षा त्यांनी कधीच धरली नसावी. एका महत्त्वाच्या गुजराती मुत्सद्यानें '१९५७ च्या निवडणुकीनंतरचे मुंबई राज्याचे मुख्य मंत्री यशवंतराव होतील.' असे मला १९५४ साली केव्हातरी सांगितले होते. त्यावेळीं परिस्थिति १९५५–५६ हून इतकी वेगळी होती की मला त्या भाकिताचा अर्थबोधच झाला नाहीं अथवा यशवंतरावांची त्यासंबंधानें कांहींही हालचाल असावी असेही दिसले नाहीं. शेवटीं त्यांचे नांव जे अचानक पुढें आले ते कांहीं बड्यांच्या ओढाताणीत, एक निरुपद्रवी व सरळ माणूस म्हणून गुजराती पुढाऱ्याकडून पुढें आणले गेले आणि

तेव्हां मात्र परिस्थितीचे गांभीर्य पाहून गंभीर परिस्थितीची अवघड जोखीम स्वीकारण्याच्या निर्धारानें यशवंतरावनी मुख्यमंत्रिपद पत्करले.

* * *

यशवंतराव हे निरुपद्रवी, सरळ व आत्मविश्वासाचे बाबतींत कमकुवत आहेत असा भरवंसा बाळगणाऱ्यांनींच यशवंतरावांचे अंगावर पुढारीपणाची झूल घातली असे माझे स्पष्ट-मत आहे. कारण द्विभाषिकाला महाराष्ट्राची संमति मिळवावयाची तर द्विभाषिकाचा मुख्यमंत्री महाराष्ट्रीय असणें जरूर होते. आणि मग ज्यांनीं यशवंतरावांना मुख्यमंत्रीपदासाठीं पुढें केलें त्यांना प्रथम यशवंतरावांना हाताशीं धरून आणि कालांतरानें त्यांना बाजूस सारून अथवा त्यांना वर दिल्लीला 'फेकून' देऊन राज्यकारभार हातीं घ्यायचा होता असा अंदाज करण्याला पुष्कळ आधार आहे. पण परिस्थिति त्यांच्या आवाक्याबाहेर गेली. द्विभाषिकाच्या स्थापनेपूर्वी महाराष्ट्रांत वर्षभर भडकलेली राजकीय चळवळ द्विभाषिकाच्या स्थापनेनें निवेल असे वाटलें होते. महाराष्ट्राच्या सुदैवानें ती चळवळ निवाली नाहीं इतकेंच नव्हे तर ती १९५७ सालीं सनदशीर अशा निवडणुकीच्या राजकारणांतहि शिरली व महाराष्ट्र कॉंग्रेसला निवडणुकींत फार मार खावा लागून गुजरातेतही द्विभाषिकविरोधाची आग भडकल्यामुळे यशवंतरावाना मुख्यमंत्रीपदावर बसविणाऱ्या पुढाऱ्यांना त्याजागी आपण अथवा आपल्यापैकी कोणी नजिकच्या काळात येऊ शकेल असा विश्वास राहिला नाहीं. अशावेळी, स्वतांच्या इर्षेने नव्हे तर दुसऱ्या कोणाच्या तरी डावपेचामुळे मुख्यमंत्री झालेले यशवंतराव चव्हाण त्या जागेला जर अपात्र ठरले असते तर महाराष्ट्राचे हाल कुत्रा खाताना. कारण विरोधीपक्षांतील पुढारी इतके शिवराळ व अंतःकळही होते की महाराष्ट्रांत अगदी अराजक नव्हे पण बजबजपुरी खास माजली असती. पण यशवंतरावनी आश्चर्यच करून दाखविले. द्विभाषिकास महाराष्ट्रांत भयंकर विरोध झाला. याचे कारण कॉंग्रेस-वरिष्ठांनी महाराष्ट्राचा अपमान केला असे महाराष्ट्रास वाटत होते हे तर खरेच, पण त्यापेक्षांही अधिक महत्त्वाचे कारण महाराष्ट्र कॉंग्रेस गुजराती पुढाऱ्यांच्या तंत्राने चालणारी, गुजरात कॉंग्रेसच्या वर्चस्वापुढें नेमणारी व कर्तत्वशून्य आहे असा लोकांचा फार दिवसाचा जो समज तो संयुक्त महाराष्ट्र चळवळीत महाराष्ट्र कॉंग्रेसने गुजराती पुढाऱ्यापुढें नमते घेतले यामुळें बळावला होता हे होय. पण यशवंतरावनी मुख्य मंत्रिपद घेतल्या दिवसापासून असा पवित्रा घेतला की अधिकारपदावर आपली मांड घट्ट ठेऊन स्वतांच्या प्रेरणेने ते वागत आहेत अशीं लोकांची भराभर खात्रीं पटत गेली. या नव्या भूमिकेत जे अभावी व्यक्तित्व त्यांच्या ठिकाणी दिसून आले ते कांहींसे अपूर्वच होते. हा माणूस स्वतंत्रवृत्तींचा व अभावी असूनही आपल्यातला आहे, डावपेची राजकारणापेक्षा प्रांजळ जिव्हाळ्यावर भरंवसा ठेवणारा आहे अशी जनतेची थोड्याच कालांत खात्री झाली. जणूं काहीं मुख्यमंत्रिपदाला हा माणूस पुष्कळ वर्षें सरावलेला आहे अशा सहजपणाने व दमदारपणे यशवंतराव, मुख्यमंत्रिपदावर अवघ्या त्रेचाळिसाव्या वर्षी पाऊल ठेवल्यापासून, वागत होते.

* * *

संयुक्त महाराष्ट्र चळवळ अद्वितीय अशी प्रखर जी झाली. तीमुळें दोन मोठे फायदे झाले. एकतर नेहरूंना महाराष्ट्रनिर्मितीची गरज पटलीं



व त्यानी महाराष्ट्र दिला आणि दुसरा फायदा हा झाला की या चळवळीने नवे यशवंतराव महाराष्ट्राला दिले. चळवळ प्रखर झाली नसती तर ते मागे राहिले असते अथवा मागे सारले गेले असते, पण चळवळ प्रखर झाल्यामुळें ते सत्तापदावर राहू दिले गेले इतकेच नव्हे तर आगीच्या भट्टीत सोन्याचे श्रेष्ठ गुण प्रगट होतात तसे यशवंतरावांच्या नेतृत्वांतले खरोखर अद्वितीय गुण प्रगट झाले. लोकशाहीत मतभेद, स्पर्धा मत्सर या गोष्टी अपरिहार्य असल्यानें सर्वसंमत अशा तुलना अशक्य असतात. पण मी एवढे खास म्हणू शकतो की एवढ्या प्रखर चळवळीला तोंड देऊन लोकांत आपली लोकप्रियता व प्रभुत्व स्थापू शकला असता असे ज्याचेविषयीं म्हणता येईल असा पुरुष फार वर्षांत महाराष्ट्रात झालाच नाहीं. यशवंतरावनी आपल्या गुण-स्वभावानें महाराष्ट्र कॉंग्रेसच्या नेतृत्वाबद्दलचा जनतेचा वर उल्लेखिलेला दुर्ग्रह नाहींसा केला व संयुक्त महाराष्ट्र मिळणार हे कळण्यापूर्वीच महाराष्ट्रीय जनता या नव्या नेत्याभोवतीं गोळा होऊं लागली. महाराष्ट्रीयांच्या अंगी इतके दोष आहेत व आजपर्यंत त्याची वाट इतकी चुकत गेली आहे कीं महाराष्ट्र जन्मापासून आजवर संपलेल्या दोन वर्षांत महाराष्ट्राची प्रगति अशीं फार थोडी होऊं शकली आहे. पण एक उत्कृष्ट नेता, साऱ्या महाराष्ट्राला आकृष्ट करण्याइतक्या सामर्थ्याचा, निर्माण झाला हेच महाराष्ट्राचे मोठे यश होय. मी वर म्हटल्याप्रमाणें संयुक्तमहाराष्ट्र चळवळीनें हा नेता दिला आहे व म्हणून संयुक्त महाराष्ट्र चळवळीच्या पुढाऱ्यांनीत्याबद्दल जर अभिमान बाळगाल व कृतार्थता मानली तर ते समंजस व इतिहास ओळखणारे आहेत असे मी म्हणेन. पण एकादा उत्कृष्ट मूर्तिकार आपण घडविलेली मूर्ती आपणापेक्षां सुंदर झाली म्हणूनच तिचा मत्सर करूं लागतो व ती मूर्ती घणाघातानी फोडू पाहतो त्याप्रमाणे संयुक्त महाराष्ट्र चळवळीचे पुढारी वागत आहेत. हा त्यांचा असमंजसपणा असून त्यांचे हे दुर्दैवहि आहे. असो. मला कोणाचे स्तोम माजवायचे नाहीं. पण सर्व बाजूंनीं खुरटविलेल्या, कुचंबविलेल्या, प्रतिकूल अशा शेंकडो वर्षांच्या इतिहासाच्या दडपणा खाली निर्जीव झालेल्या महाराष्ट्रास चेतना देईल असा एक पुढारी फार वर्षांपासून हवा होता. तसा तो मिळाला असता लोकाना तो दाखवून त्याचा फायदा करून घ्या असे माझ्यासारख्या प्रचारकाने

देतां किती घेशील दो करांनी...

१ मे १९६२ पासून
महाराष्ट्रांत
सर्वत्र अमलांत
येत असलेलें



# पंचायत राज्य



लोकांना सांगितलेच पाहिजे. प्रगतीला परिस्थिति व नेता या दोहोंचीही गरज असते. इंग्लंडसारख्या देशांत एकासारखे अनेक नेते लागोपाठ केव्हांही मिळतात. मागसलेल्या देशांत एकादाच श्रेष्ठ नेता मुष्किलीने मिळतो. महाराष्ट्रास आता तो मिळाला आहे. महाराष्ट्राने हा लाभ आपल्या कारणी लावलाच पाहिजे.

* * *

यशवंतराव नुसते प्रभावी वक्ते आणि हिटलरप्रमाणे भुरळ पाडणारे प्रभावी नेते असते तर माझ्यासारख्या अल्पस्वल्प माणसाने त्यांचा गौरव करण्याचे कारण नव्हते. पहाडी वक्तृत्व त्यांच्या ठिकाणी नाहींच. आणि त्यांच्या व्यक्तित्वाबद्दल आदर व आपुलकी वाटते, पण भुरळ मुळीच पडत नाहीं, इतके सर्व नेमकेपणे मी महाबळेश्वरच्या शिबिरांत निरीक्षिले आहे. ते सभेत बोलतात ते खाजगी बैठकीत बोलल्यासारखे बोलतात. महाराष्ट्राला काय हवे आहे हे त्यानीं बरोबर ओळखले असून ते त्या उद्दिष्टाच्या मागे लागले आहेत. महाराष्ट्र निर्मितीपासून यशवंतरावानी शिवाजीचा खूप गौरव केला. पण मराठ्यांच्या कोणत्याही इतिहासांतले ते कांहींही गौरवत नाहीत. शिवाजीच्या पूर्वीपासून आतापर्यंत महाराष्ट्र अर्थपराङ्मुख आहे व सुशिक्षित लोक नोकऱ्यामागे लागलेले असतात याची त्यांना खंत वाटत असून ती त्यांनी अनेकदा बोलून दाखविली आहे. मुंबईसारखी उद्योगप्रधान पण अस्ताव्यस्त राहणे त्यांना आवडत नाहींत. पण मुंबईकरांचा आधुनिक दृष्टिकोन, त्यांची उद्योगप्रियता, द्रव्यार्जनाची व संपन्न जीवन जगण्याची ईर्षा हीं खेड्यापाड्यापर्यंत पोंचली पाहिजे या गोष्टीचा यशवंतरावना हव्यास आहे. शहरापासून खेड्यापर्यंत सर्वत्र लागलेल्या भांडवलशाहीच्या जळवा त्याना ओढून बाजूला काढायच्या आहेत. पण महाराष्ट्रातली वर्गकलही वृत्ति ही, अर्थपराङ्मुखी अशा निवळ वावदूकी वृत्तीतून, उगवली आहे हे यशवंतरावनी जाणले असून श्रमजीवि वर्गानी आपले हित जपावे .पण कलहाला निदान दहा वर्षे सुटी देऊन सहकार्याने आर्थिक उत्कर्ष साधावा या मताचा ते गावोगाव प्रचार करतात. शेतकऱ्यांनी सहकाराने शेतीची विविध कार्ये करावी आणि शेतीमालाच्या प्रक्रियांचे धंदे शेतकऱ्यांनी सहकाराने करावे, मजूरानी सहकाराने मजूरीची कंत्राटे घ्यावी, महाराष्ट्रांतील शेती बव्हंश जिराईत असल्याने खेड्याजवळ धंदे नेऊनच रोजगारीचा प्रश्न सोडविला पाहिजे. दर जिल्ह्यात मोठे धंदे निघाले पाहिजेत, सार्वजनिक शिक्षणप्रसार होऊन शिकलेल्या शेतकऱ्यांनी सुधारलेली शेती केली पाहिजे, यंत्रज्ञ, शास्त्रज्ञ इतकेच नव्हे तर उदारवृत्तीने भांडवलदारही महाराष्ट्रांत निर्माण झाले पाहिजेत, कोंकण, मराठवाडा वगैरे खास मागासलेल्या प्रदेशांचे प्रश्न पुढारलेल्या व सधन जिल्ह्यांनी स्वार्थत्यागपूर्वक त्या मागासलेल्या प्रदेशाला सहाय्य करून सोडविले पाहिजेत. अशी मते महाराष्ट्राच्या एकाटोकापासून दुसऱ्याटोकापर्यंत हिंडून जाहीर सभेत व खाजगी बैठकीत पुन्हा पुन्हा आवर्जून सांगणारा यशवंतराव हा महाराष्ट्रांतला पहिलाच प्रभावी नेता होय.

× × ×

महाराष्ट्राला आज प्रचाराची गरज नसून कृतीची गरज आहे असे सारखे बोलतात, पण खुद्द यशवंतरावही केव्हां केव्हां बोलतात. पण हे बोलणे गैरसमजाचे आहे. वर यशवंतरावांचे जे विचार मीं मांडले ते प्रथम महाराष्ट्रभर पुन्हा पुन्हा मांडले गेले पाहिजेत. विचारापेक्षां कृति बरी' हे म्हणणे खरे नसून 'चुकीच्या कृतीपेक्षां चांगला विचार हाच अधिक चांगला, कारण तोच चांगल्या कृतीला जन्म देतो.' हे विनोबांचे मत मला पटले आहे. सारा महाराष्ट्र हा शमनाने अर्थपराङ्गमुख आहे. शेती तुटीची असून शेतकरी तीतून पळून जाण्यासाठी टपलेला असतो आणि सुशिक्षित माणूस स्वतंत्र धंदा अथवा व्यापार याकडे न वळता नोकरी शोधतो. ही वृत्ति महाराष्ट्राच्या मनोवृत्तीचा सारांश आहे. म्हैसूर, उत्तर प्रदेश, काश्मीर यांसारख्या राज्याकडे पाहिल्यास त्यांच्याशी तुलना महाराष्ट्र कलाकौशल्यांत व लहान धंद्यांतही मागे आहे असे दिसून येईल. सहकारात गुजराती शेतकऱ्याच्या फारच मागे महाराष्ट्र आहे. हे जे ऐतिहासिक दोष महाराष्ट्रांत आहेत त्यांच्या संगतीत बुद्धिमत्ता हा गुण नसून दोष झाला आहे. कारण ही बुद्धि अर्थपराङ्मुख आणि आर्थिक दृष्ट्या हताश अशा मनांत कलही व विध्वंसी वृत्ति निर्मिते. ब्रिटिश आमदानीतही गुजरातचा अर्थविकास झाला व उलट स्वातंत्र्यानंतरही महाराष्ट्रातच संप फार होत असून साऱ्या भारतात संप घडवून आणणारे 'कंत्राटदार' महाराष्ट्रातच मिळतात. विद्वान महाराष्ट्रीयांनी शिवाजीचे स्मरण करून मराठेशाहीवर सतत वादंग माजविले पण यशवंतरावानी शिवबाला एक मुजरा करून नंतर सर्व लहान शहरांत औद्योगिक वसाहती कशा स्थापाव्या, शेतीला पाणी कोठून पोचवावे, कोयनेची वीज घराघरात पोचवून लहान धंद्यांचा उत्कर्ष कसा करावा विचारांत ते गर्क आहेत. महाराष्ट्राला उत्कर्ष हवा, पण त्याठी प्रथम नेमका विचार हवा, आणि तो विचार सांगून कर्तृत्वाची प्रेरणा देणारा असा जनतेच्या विश्वासांतला पुढारी महाराष्ट्राला हवा आहे. आजवर दीर्घकालात तो मिळाला नाहीं. आंत मिळाला आहे हा लाभ मला फार मोठा वाटतो.

महाराष्ट्राचे प्रश्न सुटणे अथवा नुसते सुटण्याच्या मार्गाला लावणे हे सोपे अथवा लवकर कांम नव्हे. महाराष्ट्राचा सह्याद्रि शिवाजीला किल्ले बांधण्यासाठी उपयोगी पडला. पण आज असे किल्ले तेथे बांधण्याचा उपयोग नाहीं. या सह्याद्रीच्या पूर्वेकडून व पश्चिमेकडून खूप नद्या वाहतात. पण पूर्ववाहिनी नद्या महाराष्ट्रांतल्या खडकाळ जमिनींना सुपीक न करता आन्ध्र, म्हैसूर, मद्रास, यांचे प्रदेश सुपीक करतात. आणि पश्चिमवाहिनी नद्या कोंकणांतील डोंगर उतारांतील माती समुद्रांत नेऊन खडक वर आणतात आणि खाड्या व समुद्र होरून टाकून जलवाहतूक अशक्य करतात. पण निसर्गाला नांवे ठेवण्यावर उपयोग काय ? निसर्ग प्रतिकूल असतो तसा अनुकूलही असतो. सह्याद्रीत पाण्यापासून स्वस्त वीज निर्मितीची जेवढी शक्यता आहे अशी भारतात इतरत्र क्वचितच आहे. मराठवाडा, विदर्भ, खानदेश, कोल्हापूर, सोलापूर, पुणे वगैरे कांही भागात जमीन पुष्कळ सुपीक आहे. नद्या उगम पावणारा प्रदेश दूर अंतरापर्यंत डोंगराळ असल्याने पाटबंधाऱ्यांची शक्यता फार थोडी आहे, पण एकेका आटोपशीर नदीखोऱ्याची योजना आखली तर घाटमाथ्यावर जंगल, मध्ये पठारावर बागाईत शेती व त्याली [illegible]






प्रदेशात कमीअधिक पाणी मिळेल त्याप्रमाणे बागाईत व जिराइत शेती, जंगली मालाचे कारखाने, शेतीच्या कच्च्या मालावर प्रक्रिया करणारे कारखाने असे सलग व सुसंगत उत्पादन आखता येईल. 'घोडखोरे विकास योजना' या नांवाने महाराष्ट्र दुष्काळ निवारण समितीने अशी एक योजना तयार केली असून ती गिरणा, गोदा, भिमा व कृष्णा या चारही नद्यांच्या प्रचंड खोऱ्यांना लागू पडेल असे त्या आंखणीत म्हटले आहे. मरांठवाडा व विदर्भ यांची पहाणी करून यांच्या अशाच योजना आंखणे जरूर आहे. बेळगांव, कोल्हापूर व कोकणी जिल्हे आणि नागपूर, चांदा वगैरे विदर्भी जिल्हे यांत कोळसा, मँगॉनीज, बॉक्साइट, लोखंड वगैरे खनिज द्रव्ये खूप आहेत, चूनखडी जागोजाग असून सीमेंट कारखान्यांना ती आमंत्रण देती आहेत. बुद्धिमान, विद्वान लोकांची फार मोठी परंपरा महाराष्ट्रांत असून सर्व जातीत अलौकिक बुद्धिमत्तेचे लोक निघाले आहेत. पण शंभर वर्षे हळूहळू तुटीच्या होत गेलेल्या शेतीने कर्जबाजारीपणाची आणि शेती व्यवसाय अनास्थेने करण्याची सवय शेतकऱ्याला लागली आहे. जो शिकतो तो नक्त पगारी नोकरीमागे धावतो, शेती, व्यापार, उद्योगधंदा स्वतःच्या धाडसाने,करण्याची सवय, कल्पकता व आत्मविश्वास महाराष्ट्रीयांत नाहीं. दिवसानुदिवस व्यापार व उद्योग या क्षेत्रात भांडवलाही पद्धतीने पाऊल टाकण्याला नव्या लोकांना वाव फार थोडा असून अनुभव, धाडस व भांडवल महाराष्ट्रीयापाशी नाहीं. अशा स्थितीत परस्पर सहकार आणि सरकारचे साहाय्य व मार्गदर्शन यांच्या बळावरच प्रगति करतां येईल. असा प्रयत्न सुरू झाल्यापासून लक्षांत येण्याजोगे यश येण्याला एक पिढी खर्ची पडेल. ही सर्व गरज बुद्धीने उमजलेला नेता आजवर मिळाला नव्हता तो आज खास मिळाला आहे. जनता व विशेषेकरून सुशिक्षित मध्यमवर्ग आपली अर्थपराङ्गमुखता सोडून उत्पादनाच्या कार्यांत योजना, हिशेबीपणा व पुढाऱ्यावर निष्ठा दाखवितील तर यश खास येईल. जातीयता वगैरे जे दोष आपणांत आहेत त्यांचे महत्त्व मला वाटत नाही, रोजगारी ऐपत वाढून आर्थिक विषमता घटत गेली, की सामाजिक दोष अथवा उपेक्षणीय ठरतात.

• • •

---

( पान ४९ वरून )

वांटणी एक एक वर्षाची आहे. या वांटणीला काहीतरी अर्थ आहे. ( मराठींतील दोन महिने बारा दिवसांची वांटणी ही केवळ अर्थशून्य आणि खुळचट आहे. ) द्रौपदीकडे मन मानेल त्यावेळीं मन मानेल त्या पतीनें जावें अशी जर वांटणी असती तर द्रौपदीस जे पांच पुत्र झाले त्यांतून अमूकच अमक्याचा असें सांगणें शक्य नव्हतें. बहुपतित्वाच्या चालीप्रमाणें तें पांचहि पुत्र युधिष्ठिराचेच मानावयास हवें होतें. असें न होतां ज्या अर्थी अमक्याचा अमूक असे पुत्र तिला झाले त्याअर्थी एका पतीकडून पुत्रवती होईपर्यंत द्रौपदीनें त्याच्याकडे रहावें हाच एक मार्ग उरतो. या दृष्टीनें एक वर्षाची मुदत जरा घाईची वाटली तरी अशक्य नाहीं. कुंतीला एकेका नवऱ्यापासून एकेका वर्षाला एकेक पुत्र होतो असें वर्णन आहे. द्रौपदीच्या बाबतींतही तें शक्य आहे.

आपणास असेंहि मानावयास हरकत नाहीं कीं पांडवांचे निवासस्थान केवढेंहि असलें तरी द्रौपदीचें शयनस्थान एकच असावें आणि त्याठिकाणीं हे नवरे आपल्या पूर्व नियोजित पाळीप्रमाणे जात असावे. अशा परिस्थितींत अर्जुनाकडे एकच तरवार होती असें मानलें तरी ती द्रौपदीच्या शयनांत जाण्याची शक्यता कोणती बरें ? जर त्यावेळीं द्रौपदीच्या शयनावर अर्जुनाचा अधिकार असेल तर तो पूर्व दिवशीं जेव्हां तिच्या शायनांत गेला तेव्हां ही तलवार तिथें राहिली असणें शक्य आहे. समजा हा अर्जुनाचा द्रौपदीवरील अधिकाराचा योगायोगानें शेवटचाच दिवस असला तर तिच्या पाळीसाटीं उत्सुक असलेला पुढचा नवरा तिच्या शयनांत दिवसा जाणें शक्य आहे. पण हा नवरा युधिष्ठिर असूं शकत नाहीं. पांडव हें नेहमीं वयाप्रमाणें पाळया लावतात. विवाहांत धर्म भीम अशी पाळी आहे. यक्ष प्रश्नामधें सहदेव नकूल अशी पाळी आहे. सहदेव नकूल हीच पाळी स्वर्गारोहणांतहि आहे. त्यामुळें अर्जुनांनंतर द्रौपदीशीं पाळी भीमाची अथवा नकुलाशीं असणार. त्यांतूनही युधिष्ठिराचा मुलगा सर्वांत मोठा असतो हें लक्षांत घेतां आणि विवाहक्रम लक्षांत घेतां ती पाळी नकुलाची असणेंच संभवनीय आहे. कारण युधिष्टिर हा मुखाला आपली पाळी प्रथम लावित असतो. कामाला अथवा मृत्यूप्रसंगीं ती उलट लागलेली असते. मग नकुलाच्या पाळीच्या या प्रसंगी युधिष्टिर द्रौपदीच्या शयनांत कसा ?

अर्थात यांत चूक असेल तर ती धर्माचीच आहे. ब्राह्मण आणि चोर हें सारे थोतांड आहे. द्रौपदीवर यावेळीं अर्जुनाचाच अधिकार आहे. त्याच्यावर राज्यकारभाराची जबाबदारी नसल्यानें तो दिवसा आग रात्रीं द्रौपदीस भेटावयास गेलला आहे, अशा वेळीं विश्वासानें जेव्हां तो आपल्या शयनांत जातो तेव्हां त्याला तेथें युधिष्ठिर नजरेस पडतो.

माझ्या मनास वाटेल तो धर्म असें मानणाऱ्या युधिष्ठिरास सारें कांहीं शक्य आहे. ज्या कारणामुळें द्रौपदीला पहातांच युधिष्ठिराच्या इंद्रियांत कामवासना प्रकट होते; ज्या कारणानें अर्जुनानें जिंकिलेल्या द्रौपदींत तो आपलाही वांटा ठेवून घेतो, त्याच कारणानें तो यावेळीं द्रौपदीच्या शयनांत असतो. जनमेजयानें हें ओळखलें आणि तें वैशंपायनाच्या तोंडून वदवावयास नको म्हणून आपला चौकसपणा आंवरून धरला, त्यानें सांगितलेल्या चोरांच्या आणि भटांच्या गोष्टीवर समाधान मानलें.

अर्जुन वनांत गेला तोही या मुळेंच. जी द्रौपदी वस्तुतः सर्वस्वी आपलीच तिच्या—आपल्या संबंधाची चाललेली परवड पाहून त्याला उद्वेग न येणार तर काय होणार ? आणि असा उद्वेग आल्यावर तो डोक्यांत राख घालून वनांत न जाणार तर काय करणार ? कृष्णासारख्या जादुगारानें सुभद्रेसारखें भद्र औषध देऊन त्याच्या उद्वेगावर उतारा दिला तेव्हांच तो शांत होऊन मागें परतला.

• • •








अनुक्रमणिका

लोकराज्याचें स्वप्न साकार झालें

१ मे १९६२ पासून महाराष्ट्रांत सर्वत्र

# पंचायत राज्य













# प्रवास माझ्या गोमंतकाचा

"पाणी वाढूं लागलें तशी पांचावर धारण बसली, त्या दोन लष्करी ट्रकांच्यामधें सांपडल्यामुळें-निमंत्रणावांचून मोक्ष जवळ आला असें वाटूं लागलें." गोमंतकाच्या प्रवासांत लेखकास असे विविध आणि विचित्र अनुभव आले. त्याची ही मागील अंकावेरून चालू असलेली बहारदार चित्तरकथा—

— गोपालकृष्ण भोबे

पणजी ते बेतीं–वाहातुक करणाऱ्या फेरी बोटी पूर्वी लहान होत्या. आतां त्या खूप मोठ्या आहेत. म्हणजे पूर्वी जिथें एक खाजगी मोटार आणि पन्नास-साठ माणसें इतकें वजन घेऊन फेरीबोट पलीकडे जाई–तिथें आज–दोन लष्करी ट्रक, तीन लहान मोटारी आणि शंसव्वासें माणसें एवढें वजन घेऊन ती पणजीहून बेतींत जाते. पणजीहून एक फेरीबोट सुटली कीं दुसरी बेतीहून सुटते. अशा या दोन फेरी बोटींच्या फेऱ्या दिवसभर आणि रात्रींदेखील अव्याहतपणें चालू असतात. ज्या फेरी बोटींतून मी पलीकडे जात होतों तींत दोन लष्करी ट्रक, दोन लहान मोटारी आणि शंभर एक माणसें होतीं. या लष्करी ट्रकांपैकीं एकांत सिमेंटचीं पोतीं भरलेलीं असल्यानें वजन भारी झालें, आणि फेरीबोट नदीच्या मध्यावर येतां येतां नदीच्या लाटा फेरीबोटीच्या दरवाज्यावर बसून आंत पाणी येऊं लागलें. हां हां म्हणतां पावलें बुडालीं आणि पाणी वाढूं लागलें. पलीकडे जाणाऱ्या बायका पोरांच्या किंकाळ्या सुरूं झाल्या–'मागें व्हा–मागें व्हा-दरवाज्याजवळ गर्दी करूं नका. थांबवा-थांबवा पुढें जाऊं नका–कशाला हे ट्रक घेतात कोण जाणे...! बुडाली बुडाली...' असा एकच आकांत झाला.

माझ्या डोळ्यांपुढें ब्रह्मांड उभें राहिलें, खालीं ठेवलेली कपड्यांची बॅग हातांत घेऊन ढोपरापर्यंत लेंघा उचलून घेऊन, कशा रीतीनें जीव वांचवावा याचा विचार करीत आणि मनांत देवाचा धांवा करीत मी उभा होतों. काय करावें सुचेना. गिल्ला वाढला होता. अर्धी अधिक जागा लष्करी ट्रकांनी आणि राहिलेली त्या खाजगी मोटारींनी व्यापल्यानें पाठी सरकायला अजिबात जागा नव्हती. जो तो एकमेकांवर खेकसत होता. आणि तशा त्या परिस्थितींत देखील हमरी तुमरीवर येत होता.

एक सुटबूट घातलेला कुरळ्या केसांचा अपटुडेट माणूस, एका मळक्या धोतरवाल्यावर तुच्छतेची नजर रोखून म्हणत होता—

"तूं फाटी सर म्हुणून कोणांक सांगता रे ! तुका जाय जाल्यार तूं फाटी सर–म्हजी काळजी तुका नाका ! हांव तुजॅ भाषेन भित्रॉ न्हंय !" त्यावर तो धोतरवाला म्हणाला—"हें ग बाबा किदें ! बऱ्याक गेल्यार खंय कळा ना ! म्हाका गा किदें-बुडना तर तूं !"

"ए ओगी बस पळौया ! शिमरॉ खैचॉ !"

"शिमरॉ तुजॉ बापूय !" आणि इथें तोंडाला तोंड लागलें. मनांत आलें—एक भयानक स्थिति आ वासून समोर उभी असतांना यांना भांडण सुचतें तरी कसें ! बाकी भांडण हें कांहीं गोमंतकीय माणसांच्या पांचवीलाच पुजलेलें आहे, प्रसंग कोणताहि असो––तो मंगल असो, अमंगल असो, कोंकणी–मराठी वादाचा असो किंवा खरेदी विक्रीचा असो, सर्व ठिकाणीं भांडण–भांडण भांडण ! या माणसांना भांडणाला काळवेळ लागत नाही.

पाणी वाढूं लागलें तशी पांचावर धारण बसली, त्या दोन लष्करी ट्रकांच्यामध्यें सांपडल्यामुळें–निमंत्रणावांचून मोक्ष जवळ आला असें ठाम वाटूं लागलें. 'मन चिंती, तें वैरी न चिंती' असें म्हणतात. काळजाला एक विलक्षण धक्का बसला. नाडी जलद चालूं लागली. इतक्यांत सुकाणूंवाल्यानें इंजिन ड्रायव्हरला इशारा देऊन फेरी बोटीची गति एकदम शून्यावर आणली. हळूहळू पाणी निचरूं लागलें. सुकाणूंवाल्याजवळ असलेल्या –खास ठेवलेल्या-दोन भोकांतून तें वाहून जाऊं लागलें. मग त्यानें लोकांना इशारा देऊन-हालचाल मंद करायला सांगून शक्य तितकें पाठी यायला सांगितलें आणि एकदम हलक्या गतीनें आस्ते आस्ते बोट वेतीच्या धक्क्याला लावली. मवासचे ते दोघे मात्र दोन टोकाला राहून बापावरून आपआपल्या कुलांचा उद्धार करण्यांत गर्क होते.

लष्करी ट्रकांत सिमेंटचीं पोतीं भरल्यामुळें हा सर्व प्रसंग ओढवला, असें ज्यावेळीं बाकीच्या उतारूंना कळलें तेव्हां ते सर्व एकमुखानें लष्कराला शिव्या घालूं लागले—

"म्हणे आमचें कल्याण करायला आले आहेत ! आज आम्ही मेलों असतों तर

यांच्या बापाचं काय गेलं असतं ? ट्रकांत सिमेंटचीं पोतीं भरलेलीं आहेत हें आधीं सांगायला यांची काय वाचा बसली होती ? जिकडेतिकडे हैदोस मांडलाय मेल्यानी. चोऱ्या काय, मारामारी काय, शीं, शी, शी, शी, वैताग आला...!"

भारतीय लष्कराबद्दल गोमंतकीयांत निर्माण झालेली ही अत्यादराची (?) भावना; आणि मला त्याचें झालेलें हें पहिलें दर्शन !

सुटकेचा एक दीर्घ निःश्वास सोडून बॅग घेऊन मी धक्क्यावर उतरलों. आणि क्षणभर परमेश्वराचे आभार मानीत आसपास नजर फिरवीत उभा राहिलों. धक्क्याच्या डाव्या बाजूला असलेल्या लाकडी खांबाला रेलून एक 'कुणबी (गोव्यांत त्यांना गावडे म्हणतात) मोठमोठ्यानें स्वतःशींच बोलत होता. दिसण्यांत तो अर्धा निग्रोच होता. त्यानें गडद निळ्यारंगाची-डँग्रीची-विजार घातली होती आणि ती ढोपरापर्यंत दुमडून घेतलेली होती. अंगांत ठिकठिकाणीं लालमातीनें डागळलेला सिल्कचा शर्ट, गळ्यांत क्रॉस असलेली सोन्याची सांखळी, हातांत सिगरेटचा डबा व पायानें अनवाणी असा त्याचा थाट होता. केवळ एक लंगोटी, अंगांत बनियान आणि डोक्याला मुंडासें हा अनादिकालापासून चालत आलेला आपला वंशपरंपरागत पेहराव सोडून-गावड्यांनी-आपल्या पेहरावांत आणलेली ही अविचारी आधुनिकता पाहून हसूं आलें. आपलें अंग घुसळून तो एकंच विषय बोलत होता—

> ओठरा हॉजार पुलींस हाडले फूंय-हाडा तँका-मुग्या आंगार घालायत-हांव एकटॉच तांका जिंते मारतां ! कितें सॉमजॉल्यात ? हांव एकटॉच मारतां हॉ पोय-ऑसॉ—

असें म्हणून त्या लाकडी खांबावर तो थपडा मारीत होता. फार फार तर अर्धी बाटली तो प्यायला असावा; पण त्या अर्ध्या बाटलीनें अठरा हजार सैनिकांना एकट्यानें मारायचें बळ त्याच्या अंगांत संचारलें होतें. येणारा जाणारा त्याच्याकडे कुणीहि लक्ष देत नव्हता. त्यांना हें दृष्य रोजचेंच होतें. कारण गोव्यांत रोजच अशीं कित्येक माकडें रस्तोरस्तीं धुमाकूळ घालीत असतात !

बेतींपासून माझें गांव तीन सव्वातीन मैल दूर आहे. पूर्वी इथून आमच्या गांवांत जायचें म्हणजे एक पायीं तरी चालत जावें लागे किंवा



खरा गावडा

बैलांच्या धमनींतून. आतांच्यासारखीं हुकमी वाहनें नव्हतीं. ही धमनी गांवांत पोहोंचेपर्यंत शरीरांतल्या साऱ्या धमन्या आखडल्या जात आणि हाडें खिळखिळीं होत; पण आतां त्या धमन्या इतिहासजमा झालेल्या आहेत. एखादा टॅक्सीवाला मला घेऊन जाईल किंवा काय अशा विचारांत असतांना, अठरा वीस वर्षांच्या एका युवकानें माझ्याजवळ येऊन माझ्या हातांतील बॅग आपल्या हातांत घेतली. आणि जवळपास असलेल्या एका काळ्याशार चकचकीत गाडींत नेऊन ठेवली. माझ्या गांवच्या दिशेकडे बोट करून मीं म्हटलें 'मला या बाजूला जायचें आहे !' तशी तो म्हणाला, "मी ओळखतां तुम्हांला चला तुम्हीं !" मी थक्क झालों; पण मागाहून कळलें कीं तो युवक माझ्या गांवचाच होता. मीं त्याला लहानपणीं पाहिलें असल्यानें त्याची ओळख मला पटली नाहीं.

*     *     *

वेऱ्याला मागें टाकून गाडी डाव्या हाताला वळली आणि नेरूल या माझ्या गांवच्या रस्त्याला लागली. वेरें आणि नेरूल या दोन गांवाच्या शिवेवर शांतादुर्गेचें देऊळ आहे. या दोन्हीं गांवांची ही ग्रामदेवता. वेरेंकर समाज तिला 'शांतादुर्गा वेरेंकरीण' म्हणतो तर नेरूलकर समाज तिला 'शांतादुर्गा नेरुलीकरीण' म्हणतो. देवळांतल्या उत्सवांवरून या दोन्हीं समाजांत पूर्वी पिढीजात हाडवैर होतें. दोन्हीं समाजांमधून विस्तव जात नव्हता. हिंदुमुसलमानांतल्या वैरापेक्षांहि हें गांवागांवांतले वैर विलक्षण होतें. देऊळ ही बाब सोडली तर एरवीं आपआपसांत एकमेकांची नातीं होतीं एकमेकांचे व्यवहारी संबंध होते-सर्व कांहीं होतें, पण देवळांत आले, कीं अंगांत संचारल्याप्रमाणें एकमेक एकमेकांकडे शत्रुत्वानेंच पाहात. देवळांतले मोठे उत्सव दोन. 'रामनवमी' हा नेरूलकरांचा उत्सव आणि मार्गशीर्षांतील 'गोपाळकाला' हा वेरेकरांचा. हा उत्सव म्हणजे मुख्यत्वेंकरून नाट्योत्सव; परंतु दोघांत काय कमीं पडतें: आणि उणेपणा सांपडून निंदायला कसें मिळेल, या करितां दोघेहि डोळ्यांत तेल घालून टपलेले असत. एकाच्या नाटकाचा बेरंग व्हावा म्हणून दुसरे झटत आणि दुसऱ्यानें केलेल्या अपमानांचें उट्टें कोणत्या उपायानीं काढावें याशाठीं पहिले गांवकरी वर्षभर विचार करून ठेवीत. नाटक चालू असतांना, पहिल्या दिवशींच्या नाटकाबद्दलची उण्यादुण्या अभिप्रायाची जाहिरात छापून वाटणें, एखादा नाटकांतील प्रवेश ऐन रंगांत चालू असतांना सोड्याच्या (गोटीच्या बुचाच्या) बाटल्या मंडपांत आणून-कोंऽऽऽ कूंऽऽऽ—असा आवाज काढून उघडायला लावणें व त्या आपल्या कुटुंबियांना वांटणें—असे प्रकार फार चालत. केवळ आमच्या गांवच्याच नव्हे, तर अखिल गोमंतकांतील भिन्न भिन्न देवांच्या भक्त समाजांत अशी ही कौटुंबिक चुरस चालतेच. आणि अशा या चुरशींतूनच ईर्षा जागृत राहात होती. उत्सवाला त्यामुळें उधाण येत होतें. कांहीं तरी नवीन घडत होतें...

मीं देवळाजवळ आलों आणि कुलाचाराप्रमाणें गाडी सभामंडपाजवळ बळवायला



गावड्याची अविचारी आधुनिकता







सांगितली; पण बाहेर येऊन पाहिलें तों रस्त्याच्या कडेला अर्धा पाऊण फर्लांग होईल एवढा कुंपणासारखा एक बेडौल दगडी तट कुणींतरी बांधून ठेवलेला दिसला. तो कां बांधला आणि असा विसंगत बांधून ठेवायचा मतलब काय कांहीं कळलें नाहीं. आमच्या गांवचा तो गाडीवाला मुलगाहि सांगूं शकला नाही.' हा श्रीमंति मद होता कीं एखादी मूर्ख महत्वाकांक्षा होती हें श्री शांतादुर्गाच जाणें! मनांतला तापद विचार झटकून टाकून मीं देवळांत गेलों. सगळीकडे एक नीरव शांतता होती. प्रसन्नतेचें आगर असलेलें स्मितवदना शांतादुर्गेचें मुखकमल दीपमालेंतल्या केसरी ज्योतींच्या मंद प्रकाशांत अपारसौन्दर्याची प्रभा उधळीत होतें. कालचक्राच्या फेऱ्याची कित्येक वेगवान अवस्थांतरें झालीं; पण धर्मच्छलाची पर्वा न करतां श्रद्धेनें जोपासलेली ती संस्कृति, आणि तिच्या निष्ठेच्या साक्षात्कारानें मन भारावून गेलें. बालपणींच्या साऱ्या आठवणीं एकत्रित झाल्या. डोळे भरून आले,

* * *

मला वाटलें होतें गावांत संपूर्णतया बदल झाला असेल. अगदीं सलामिलाच दिसलेल्या आणि मला गांवांत घेऊन आलेल्या गांवच्याच अद्यावत मोटार गाडीनें आशा पालवल्या होत्या. आजपर्यंत ऐकत आलेल्या गोष्टींत निदान पन्नास टक्केंतरी तत्थ्य असेल असें वाटत होतें; पण छे! गांव होतें तसेंच होतें. त्याच्यांत लवमात्र बदल झालेला नव्हता. रस्ते पूर्वीपेक्षां खराब झाले होते. आडव्या तिडव्या नागमोडी वाटा, आजूबाजूला खुरटीं झुडपें, मनमानेल तिथें उभारलेलीं आकार नसलेलीं घरें—सर्व कांहीं जैसे थे होतें. गांवच्या बाजारपेठेंत बदल झालेला नव्हता. रचनेंत बदल झालेला नव्हता जसें पूर्वी होतें तसेंच होतें. उलट जें होतें तें चैतन्य हीन वाटत होतें. आनंद एवढाच होता कीं दीर्घ कालावधीनंतर मला माझ्या जन्मग्रामाचें दर्शन होत होतें. तें कसेंहि असलें तरी मीं डोळे भरून पाहात होतों. बरोबरीच्यांना भेटत होतों. भावी पिढीची ओळख करून घेत होतों. बोलण्यांत विषय एकच होता स्वातंत्र्य प्राप्तीच्या सुवर्ण घटिकेचा आनंद, भारतीय सैनिकांनी परक्यांना हुसकून लावतांना गाजविलेल्या पराक्रमाच्या नेत्रदीपक-रोमहर्षक रम्यकथा, आणि नतरच्या कालांत त्याच भारतीय सैनिकांनीं व अधिकाऱ्यांनी केलेल्या, अक्षम्य चुकांमुळें आलेली विषण्णता; आणि जनतेंत त्यांच्याबद्दल उत्पन्न झालेला अविश्वास.

* * *

दुसऱ्या दिवशीं सकाळीं नऊ वाजतां मी म्हापशाला आलों. म्हापशाच्या मोटर स्टॅंडवर प्रोफेसर शाणूं कामत बुडकुले भेटला. खरें म्हणजे शाणू कामत हा पुर्तुगेज प्राथमिक शाळेंतला एक शिक्षक; पण पुर्तुगेजांचें एक बरें होतें. शिक्षक—मग तो प्राथमिक शाळेचा असो किंवा विश्वविद्यालयाचा असो—सरसकट सर्वांनाच प्रोफेसर ही पदवी होती. मध्यंतरी पुर्तुगेज सरकारने जी अतोनात पगारवाढ



प्रो. शाणु कामत बुडकुले

केली त्यांत पहिल्या दर्जाच्या प्राथमिक शिक्षकाचा पगार सत्तर-पंचाहत्तर रुपयांवरून एकदम साडेपांचशें रुपयांवर नेला होता. एवढा पगार मिळत असूनहि शाणूं कामतांच्या वेषांत मात्र फरक झालेला नव्हता. त्याचा वेश मोठा गमतीचा ज्याला इंडोपोर्तुगीज म्हणावें असा होता. साध्या ब्राह्मणी पद्धतीने नेसलेल्या धोतराच्या पोटांत शर्ट, आंखूड कोट, गळ्यांत टाय, डोक्यावर काळी वाटोळी टोपी, पायांत बूट मोजे आणि या सर्व व्यंगात्मक अवताराला पूर्ति यावी म्हणून ओठावर ठेवलेली हिटलर कट् मिशी.

शाणू मला कित्येक वर्षांनी भेटला होता; पण गृहस्थानें माझी चौकशी तरी करावी! छे! नुसती माझ्या पाठीवर थाप मारून त्यानें आपली कैफियत मांडायला सुरुवात केली. म्हणाला—

"बरं झालं तूं भेटलास या नेहरूनें (गोव्यांत परमेश्वरालाहि अरे तुरे म्हणतात, तिथें मानवाची काय कथा!) इतक्या लवकर हयं यायची घाई कां केली? आणखी तीन वर्षांनी आम्हीं पेन्शनींत आलों असतों. त्यानंतर त्याने यायला हवं होतं. आतां आमचं कसं होणार! पांच मुली दोन मुलगे, मीं, बायको........"

शाणू आपली वंशावळ सांगत होता.; पण त्याच्या प्रश्नाला मीं काय उत्तर देणार होतों; आणि उत्तर द्यायला मीं भारत सरकारचा कुणी प्रतिनिधि थोडाच होतों! एकंदर परिस्थितीनें तो बावरून गेला होता हें मीं ओळखलें; पण भावी पिढीला ज्ञानसंपन्न करणारा हा प्रोफेसर, अशी अविचारी बडबड करील असें मला वाटलें नव्हतें. त्याला विशेष कांहीं सांगायला गेलों तर तो मलाच मूर्खांत काढील—आणि भांडेल—हें मीं जाणून होतों. ज्या गृहस्थाला स्वतःपुढें दुसऱ्याबद्दल यत्किंचितहि भावना नाहीं, अशा माणसाशीं संभाषण तरी कशाला वाढवा, म्हणून मीं त्याला कोणतेंहि उत्तर दिलें नाहीं. त्यानें डोक्यावरील टोपी काढून डाव्या हातांत घेतली आणि उजव्या हातांतल्या रूमालानें आपल्या टकलावरचा घाम पुसला, आणि 'बरँ आसा, यॅतां' असें म्हणून तो निघून गेला. इतक्यांत 'सांकळे, सांकळे' असें त्रिवार उच्चारीत जुन्या जमान्यांतीली एक पितळी पत्र्यानें नखशिखांत मढविलेली एक बस आली. शाणू सारखे आणखी कुणी भेटून मनस्तापाला कारणीभूत होऊं नये म्हणून मागचा पुढचा विचार न करतां मीं त्या जुनाट बसींत चढलों आणि सांखळीचें तिकिट मागितलें.

बस अमर्याद खच्चून भरली होती आणि आणखीहि भरली तर हवी होती. विचारणारा कोणी नव्हता. बस चालूं लागली आणि बसमध्यें बसलेल्या लोकांच्या चर्चा सुरू झाल्या. सगळ्यांच्या चर्चेचा सूर एकच होता. भारतीय सैनिकांचें अविचारी वागणें. कुठेंतरी एक मोठी चोरी झाली होती. एका भारतीय शिख सैनिकाने दारू पिऊन भयंकर धुमाकूळ घातला होता. ज्यांना आपलें म्हणून उत्साहानें कवेंत घेतलें त्यांनी कृतघ्नपणा केला होता. ज्यांनी भुकेला अन्न दिलें त्यांच्याच तोंडचा घास ओढून काढायचा राक्षसीपणा केला होता.

केवळ सैनिकांकडून हा छळवाद झाला एवढ्यावरच या गोष्टी संपत नव्हत्या; तर स्वातंत्र्यावादी म्हणविणाऱ्या कांहीं पाखंडी लोकांबरोबर कांहीं बाजारबुणगे लोक जो धिंगाणा घालीत होते, त्यामुळें प्रतिष्ठित लोकांना उणेपणांत दिवस काढावे लागत होते. काल कपचखा विसळणारीं पोरें आल्या संधीचा फायदा घेऊन निरपराध घरंदाज माणसांचा अपमान करीत होतीं. खादीचा सदरा आणि लेंगा घालणाऱ्या कुणीहि फालतू माणसानें कायदा हातीं घेतला होता. हें काय चाललें आहे आणि याचा परिणाम काय होणार आहे, कुणीहि सांगूं शकत नव्हता साऱ्यांच्याच मुखावर एक भलें मोठें प्रश्नचिन्ह उभें होतें. (आणि अजूनहि तें तसेंच आहे!) ● ● ●








संपादक दीपावली,

स. न. वि. वि.,

एप्रील १९६२ चा दीपावली वाचला. दीपावली नेहमीच चांगली असते.

श्री. **आत्माराम नीलकंठ** यांच्या लेखमालेंतला 'ब्रायकोचेहि वांटे केले' हा लेख वाचला. लेख वाचल्यामुळें महाभारतांतील मुख्य व्यक्तींचें थोडेफार स्वभावदर्शन घडलें. परंतु मुख्यांत मुख्य म्हणजे नायिका द्रौपदी तिचें व्यक्तीमत्व तितकेसें स्पष्ट नाहीं. **विशिष्ट** अर्थानें श्यामा असलेली ही स्त्री **शालीन** कशी असते हें पटवून देण्याची जबाबदारी लेखकानें टाळली आहे. कदाचित् पुढल्या लेखांत त्या मुद्यांचें विवरण करण्याचा लेखकाचा मानस असेल. पण मी थोडीशी आगाऊ आहे.

श्री. **आत्माराम नीलकंठ** यांचे आडनांव काय ? पुराणिक वाटतं ? रिकाम्या वेळांत एक चांगला उद्योग शोधून काढलेला दिसतो. का त्यांचा व्यवसायच तो आहे ?

आ. नम्र,

**कु. शैला**

ता. क.–हें पत्र प्रसिद्ध करूं नका, भलतंच !

(ही सर्व लेखमाला संपली कीं मग लेखकाचें नांव प्रसिद्ध करण्यांत येईल, तोंपर्यंत आपण त्यांना पुराणिक समजलेत तरी हरकत नाहीं. — **संपादक**)

स. न. वि. वि.,

पत्र लिहिण्यास कारण आपल्या 'दीपावली' मासिकांतील महाभारताचें नवीन दृष्टिकोनांतून मंथन करणारी "हा जय नांवाचा इतिहास आहे" ही श्री. **आत्माराम नीलकंठ** यांची लेखमाला.

अजूनपर्यंत फक्त दोनच खंड प्रकाशित झाले आहेत. पण ते जिज्ञासू अन् चिकित्सक वाचकांचें मन आकृष्ट करण्यास खचितच समर्थ आहेत. माझ्याहि मनांत बरेच वेळां महाभारतांतील प्रमुख पात्रांविषयीं प्रश्नचिन्ह उभें रहातें. लेखकांचे विचार सनातन दृष्टिनू विचार करतां बंडखोरीचे वाटतील. पण त्यांना तर्काचा सबळ पाठिंबा आहे. लेखकानें अवतरणांत मूळ ग्रंथांतील आधार नमूद केले आहेत ते मुळांतून उद्धृत केल्यास सामन्य वाचकाच्या दृष्टिने सोयीचें होईल हें नमूद करावें असें वाटतें.

प्रथमच लिहिल्याप्रमाणें लेखमाले संबंधी कांही विचार व्यक्त करणे तूर्त तरी उचित होणार नाही, मी हें पत्र आपल्याला मुख्यतः या विचाराने लिहीत आहे कीं या लेखमालेतील क्रमशः प्रसिद्ध होणाऱ्या खंडाचा विस्तार (length) विषयाच्या व्याप्तीच्या मानानें पुरेसा वाटत नाहीं. त्यामुळें मनाचें पुरेसें समाधान होत नाहीं. शक्य असल्यास निदान सध्यांचा दोन खंडाएव्हढा भाग तरी एका वेळीं प्रसिद्ध व्हावा असें मला वाटतें.

माझ्या दोन सूचनांचा आपण सहृदयतेनें विचार कराल अशी आशा व्यक्त करून हें पत्र पुरें करतो, कळावें.

आ.

**यशवन्त कोपरकर**

स. न,

आपला एप्रिलचा अंक वाचला. त्यांतील श्री. शामराव ओक यांची लेखमाला हृद्य वाटली. आपण शामरावांना लिहिण्यास उद्युक्त केलेंत याबद्दल आपलें अभिनंदन.

त्याचप्रमाणें श्री. मधुकर केचे यांचा 'मनोरे' हा लेख श्री. पु. भा. भावे यांच्या मनोरेची आठवण करून देणारा वाटला.

हे मधुकर केचे कुठचे ? मुंबईचे का ? सुंदर अंक काढल्याबद्दल धन्यवाद.

आपली,

**विलासिनी वागळे**

वि. प. रोड, मुंबई ४.

(श्री. मधुकर केचे हे अमरावतीला प्रोफेसर आहेत. —**संपादक**)

११७०/२० ब शिवाजीनगर;
पुणें ५.
१७-३-६२

श्री. संपादक, दीपावली, यांस

स. न. वि. वि.,

आजच आपला 'मार्च' महिन्याचा अंक मिळाला. वाचून फार समाधान वाटलें. कांहीं लेख तर फारच सुरेख आहेत. ज्ञान आणि मनोरंजन याबरोबर कांहीं लेखांनीं विचारांनाहि खाद्य पुरविलें.

श्री. आत्माराम नीळकंठ यांचा 'सौवीचा गोंधळ' हा लेख वरील प्रकारांत मोडेल. त्यांतील कांहीं मतें मला पटली नाहींत, पण एकंदरींत तो लेख सुरेख आहे यांत शंका नाहीं.

आपले अंक उत्तरोत्तर असेच चांगले निघतील अशी खात्री वाटते.

आपला,

**अ. वि. खर्शीकर**

स. न.

दीपावलीच्या गेल्या अंकांत प्रसिद्ध झालेला श्री. **गोपालकृष्ण भोबे** यांचा प्रवास माझ्या गोमंतकाचा हा लेख रसाळ लेखणीनें लिहिलेला वाटतो. श्री. भोबे यांनीं अशींच आणखी प्रवास–वर्णनें लिहावींत.

तुमच्या अंकाचे खास वैशिष्ट्य म्हणजे दीपमाला. इतकी वेचक, इतकी सुंदर व इतकी विचारपरिप्लुत लेखमाला इतर मासिकांत कुठेंहि आढळत नाहीं. दीपावलीचें हें वैशिष्ट्य असेंच समृद्ध राहो.

आ—

**दत्तात्रय सोमण**

बसई.









अनुक्रमणिका






## सत्यं, शिवं, सुंदरम्

### महाराष्ट्र–राज्य वर्धापन दिन

चालू महिन्याच्या सुरवातीस महाराष्ट्र राज्यानें दोन वर्षे पुरी करून तिसऱ्या वर्षात पदार्पण केलें आहे. १ मे १९६० रोजीं पंडित नेहरूंच्या हस्तें महाराष्ट्र राज्याचा उद्घाटन समारंभ झाला. त्या ऐतिहासिक प्रसंगीं महाराष्ट्राचे लोकप्रिय मुख्यमंत्री श्री. यशवंतराव चव्हाण ह्यांनीं पंडितजींचे आभार मानतांना आश्वासन दिलें कीं, 'महाराष्ट्राचें हें जें राज्य निर्माण झालें आहे तें मराठी जनतेच्या कल्याणाचें काम तर करीलच, परंतु मराठी भाषिकांच्या जवळ जें देण्यासारखें आहे, त्यांच्या जीवनामध्यें जें चांगलें आहे, जें उदात्त आहे, त्याचा त्याग जर करावयाचा असेल तर तो आम्हीं भारतासाठीं प्रथम करूं.' गेल्या दोन वर्षांचा इतिहास तपासून पाहिला तर महाराष्ट्रानें हें आश्वासन पाळल्याचेंच प्रतीत होईल. भाषावार प्रांतरचनेच्या वेळीं महाराष्ट्राला जो अन्याय झाला होता त्याच्यासाठीं मराठी जनतेनें शांततापूर्ण पण जोमदार लढा करून आपला हक्क प्राप्त करून घेतला. द्विभाषिक राज्याचें द्विभाजन होतांनाहि गुजरात राज्यानें अडेलतट्टू धोरणानें सिंहाचा वाटा बळकावण्याचा प्रयत्न केला त्यावेळीं महाराष्ट्रानें केवळ भारताच्या हितासाठीं समजुतदार धोरण स्वीकारलें. बेळगांव, कारवार व तत्सम मराठी विभागाबद्दल म्हैसूर राज्याबरोबर चाललेल्या वाटाघाटींत स्फोटक वातावरणांतदेखील महाराष्ट्रानें आपला विवेक सोडलेला नाहीं, गोव्याच्या राज्यकारभाराबाबत मध्यवर्ति सरकारचें धोरण, आणि मोरारजी व काका कालेलकरांच्या अपमानास्पद फूत्कारांची झळ लागूनसुद्धां महाराष्ट्रानें आपली समतोलवृत्ति ढळूं दिलेली नाहीं, एवढेंच नव्हे तर तिसऱ्या अर्थमंडळानें करांच्या उत्पन्नाबाबत केलेल्या वांटणींत महाराष्ट्र राज्याला उघडउघड झालेल्या अन्यायाविरुद्ध महाराष्ट्रानें ब्रहि उच्चारला नाहीं. गोदावरी–कृष्णा पाणी वाटपाबाबतहि संबंधितांचे अडमुठे धोरण उद्वेगकारक असूनहि न्याय्य मार्गानें जाण्याचा आपला शिरस्ता महाराष्ट्रानें सोडलेला नाहीं. अशा आणखी अनेक उदाहरणांवरून महाराष्ट्र राज्याची त्यागी व समजूतदार वृत्ति जाहीर झाली आहे. महाराष्ट्राची ही वृत्ति प्रतिनिधित्वानें जोजवत असलेलें राज्याचें मंत्रिमंडळ व विशेषतां महाराष्ट्राचे मुख्यमंत्रि ह्यांच्या नेतृत्वामुळें, परस्पर सहकार्यामुळें आणि सहजीवनी धोरणामुळें महाराष्ट्र राज्याचा राज्यकारभार आदर्श पद्धतीनें गेलीं दोन वर्षे चालू आहे. भाषिक तत्त्वाच्या बैठकीवर राज्याची जरी निर्मिती झाली असली तरी सर्व वर्गांच्या व सर्व जातीच्या लोकांना समान न्याय व समान संधि प्राप्त करून देण्याचें सरकारचें स्तुत्य धोरण व्यवहारांत पूर्णपणें राबवलें गेल्यामुळें राज्यनिर्मितीच्या वेळीं हितशत्रूंनीं केलेल्या कुचेष्टा, काढलेल्या आशंका व उठवलेलें रान गेल्या दोन वर्षांत आपोआपच नष्टप्राय झालेल्या आहेत. महाराष्ट्राचे लोकप्रिय माजी राज्यपाल श्री. श्रीप्रकाश ह्यांनीं त्यांच्या जाहीर निरोपसमारंभाच्या वेळीं काढलेले महाराष्ट्राच्या जनतेबद्दलचे गौरवपूर्ण उद्गार व विशेषतः यशवंतराव चव्हाणांच्या नेतृत्वाखालीं झालेल्या महाराष्ट्राच्या प्रगतीची मुक्तकंठानें केलेली प्रशंसा, हेंच महाराष्ट्र राज्याला मिळालेलें प्रशस्तिपत्रक होय. श्री. यशवंतराव चव्हाण ह्यांच्या धीरोदात्त धुरिणत्वाखालीं महाराष्ट्र राज्याची अशीच उत्तरोत्तर प्रगति होऊन भारतांत एक आदर्श राज्य अशी त्याची कीर्ति होईल यांत संदेह नाहीं. महाराष्ट्र राज्याच्या ह्या वर्धापनदिनीं आम्हीं नम्रपणें अभिवादन करतों.

### राज्यपाल डॉ. सुब्बारॉयन

गेल्या सतरा तारखेपासून महाराष्ट्राच्या राज्यपालपदीं डॉ. परमशिव सुब्बारॉयन ह्यांची नियुक्ति झाली आहे. मद्रास राज्यांतल्या तिरुपामगोडे ह्या गांवीं जन्मलेले डॉ. सुब्बारॉयन् आपलें विश्वविद्यालयीन शिक्षण मद्रास येथें पूर्ण करून ते उच्च शिक्षणासाठीं लंडनला गेले. तिथें ऑक्सफर्ड विद्यापीठाच्या वॅडहॅम महाविद्यालयांत अभ्यास करून बी. सी. एल्. ही पदवी त्यांनीं प्राप्त केली. पुढें डब्लिनला जाऊन त्यांनीं एल्एल्. डी. ची पदवीहि मिळवली. १९२० सालापासून ते मद्रासच्या लेजिस्लेटिव्ह कौन्सिलचे सभासद होते व १९२६ ते १९३० पर्यंत मद्रास राज्याचे मुख्य प्रधान म्हणूनहि त्यांनीं कार्य केलेलें आहे. १९२० सालीं व पुन्हां १९३७ ते १९४९ सालापर्यंत ते ऑल इंडिया काँग्रेस कमिटीचे सदस्य होते. १९३७–३९ ह्या कालखंडात ते मद्रासचे कायदेमंत्री होते व पुन्हां १९४७–४८ सालीं हेंच अधिकारपद त्यांनीं भूषविलें. १९४९ सालीं इंडोनेशियामध्यें भारताचे वकील म्हणून त्यांची नियुक्ति झाली होती व १९५१ पर्यंत ते तिथें होते. १९५४ ते १९५७ पर्यंत भारताच्या राज्यसभेचे सदस्य म्हणून त्यांची नियुक्ति झाली होती व त्यानंतर आजतागायत ते लोकसभेचे सभासद म्हणून कार्य करीत आहेत. १९५९ सालीं संसदेच्या पब्लिक अका



अनुक्रमणिका

उद्भ्स् कमिटीचे सभासद म्हणूनहि त्यांची नेमणूक झाली होती; व त्यानंतर मध्यवर्ति मंत्रिमंडळांत दळणवळण खात्याचे मंत्रि म्हणून ते काम करीत होते. डॉ. सुब्बरॉयन् ह्यांनीं राजकारणांत जबाबदारींचीं पदें गौरविलीं असलीं तरी त्यांचा विशेष छंद म्हणजे क्रिकेट. शालेय जीवनापासून पट्टीचे खेळाडू म्हणून त्यांचा लौकिक होता. १९३५ सालापासून त्यांनीं मद्रास राज्यांत क्रिकेट असोसिएशनची स्थापना केली. पुढें १९३८ ते १८४६ पर्यंत भारतीय क्रिकेट कंट्रोल बोर्डाचे ते अध्यक्ष होते. त्यांच्या कारकिर्दींत भारतीय क्रिकेटनें खूपच प्रगति केली व अनेक नवे तारे क्रिडांगणावर उदयास आले. शालेय क्रिकेटची त्यांची योजना उपयुक्त ठरून आज अनेक बालखेळाडूंना योग्य ते शिक्षण मिळंत आहे. ह्याशिवाय ठिकठिकाणीं सुसज्ज स्टेडियम्स् बांधण्याच्या त्याच्या योजनेमुळें प्रथम दर्जाच्या सामन्यांची ठिकठिकाणीं सोय झालेली आहे.

महाराष्ट्र राज्याच्या राज्यपालपदीं वयाच्या त्र्याहत्तराव्या वर्षी त्यांची नेमणूक झाली असली तरिसुद्धां निकोप प्रकृतीनें व अमाप उत्साहानें आपलें राज्यपालपदाचें संबंधित कार्य ते करतीलच पण त्याशिवाय मुंबई शहराच्या क्रिकेटच्या षौकाला आपल्या उपस्थितीनें ते उत्तेजन देतील. त्यांच्या अंगची खिलाडुवृत्ति जरि क्रिकेटच्या षौकामुळें बाणली असली तरी राजकारणांत तिचा उपयोग त्यांनी अनेक वेळां चातुर्यानें केलेला आहे. डॉ. सुब्बारॉयन् ह्याची कारकिर्द यशस्वी होवो. असें चिंतून आम्हीं त्यांचे हार्दिक स्वागत करतों.

## समाजकारण

### 'सारस्वत ब्राह्मणसमाज' नव्हे 'गोमंत विद्या निकेतन'

एप्रिल महिन्याच्या नऊ तारखेला मडगांव, गोवा येथील 'सारस्वत ब्राह्मण समाज' या संस्थेला पन्नास वर्षें पुरी झाल्याबद्दल एक ल्हानसा समारंभ साजरा झाला. वास्तविक गेलें वर्ष हें समाजाचें सुवर्णमहोत्सवी वर्ष होतें; परंतु तत्कालिन धुमसत्या परिस्थितींत मनांत असूनहि समाजानें आजच्यासारखा समारंभ साजरा केला नाहीं. मात्र समाजाचे संस्थापक, कार्यकर्ते आणि सभासद यांनीं एकत्र येऊन एक धडाडीचा निर्णय घेतला. तो निर्णय असा, कीं सध्याच्या लोकशाही व जातिनिरपेक्ष राज्यांत संस्थेच्या नांवांत ज्ञातिवाचक शब्द असल्यामुळें, पन्नास वर्षें रुजलेलें हें नांवच बदलून संस्थेचें 'गोमंत विद्यानिकेतन' असें नामांतर करणें !

संस्थेचे सर्व कार्यकर्ते आणि विद्यमान संस्थापक सूज्ञ आणि प्रतिष्ठित असल्यांमुळें वरील निर्णयाला सर्वांचें अनुमोदन मिळालें आणि या वर्षी–सुप्रसिद्ध साहित्यिक व 'गोमन्त' या दैनिकाचे संपादक श्री. बाळकृष्ण दत्तात्रय सातोस्कर यांच्या अध्यक्षतेखालीं गेल्या वर्षी राहिलेला संस्थेचा सुवर्ण महोत्सवी समारंभ घडवून आणून हें नामाभिदान पक्कें केलें.

हें नामान्तर केवळ गोमंतकालाच नव्हे तर अखिल महाराष्ट्राला प्रेरणादायी आहे; किंबहुना तें क्रांतिकारक आहे. अखिल गोमंतकातील प्रमुख व आदर्श अशा या संस्थेनें तीन पिढ्याचे साहित्यपिंड पोसलेले आहेत. ज्ञानवर्धक असे अनेक कार्यक्रम सतत घडवून आणून पारतंत्र्यांत असतांना दुर्बल होत जाणाऱ्या पिढीची अस्मिता सतत जागृत ठेवण्याचें अवघड कार्य संस्थेनें केलें याबद्दल संस्थेच्या विद्यमान निस्पृह संस्थापकांचे आदर्श भावी पिढीनें आपल्या दृष्टिसमोर ठेवले पाहिजेत.

गोमंतकांत अशा तऱ्हेच्या समाजसेवक संस्था फार थोड्या आहेत. ज्या आहेत त्यांनीं 'गोमंत विद्या निकेतन'चा आदर्श डोळ्यांपुढें ठेवून सतत कार्य करून आपापल्या गांवच्या संस्था अशा रीतीने नांवारूपाला आणल्या पाहिजेत. या संस्थेचे एक आधारस्तंभ संस्थापक सुप्रसिद्ध संशोधक श्री काशीनाथ दामोदर नायक यानी समारंभ प्रसंगीं 'अखिल गोमंतकीयांसाठीं एक संदर्भ ग्रंथालय असावें.' अशी इच्छा व्यक्त केली. त्यांची ही इच्छा पुरी व्हावी आणि 'गोमंतक विद्या निकेतन' ही संस्था–अखिल गोमंतकाला प्रेरणादायी ठरून–चिरायु व्हावी अशी या शुभप्रसंगीं आम्हीं शुभकामना व्यक्त करतों !

—गोपालन्

### विश्वकर्मा विश्वेश्वरैय्या

गेल्याच वर्षी शताब्दि पुरी केलेले विश्वविख्यात इंजिनिअर डॉ. मोक्षगुंडम् विश्वेश्वरैय्या ह्यांचें गेल्या महिन्याच्या चौदा तारखेला बंगलोर येथें निधन झालें. गेलें वर्षभर ते अशक्तपणामुळें आजारी होते पण जगण्याच्या दुर्दम्य इच्छेमुळें केवळ त्यांची आयुर्मर्यादा वाढू शकली. विश्वेश्वरय्या यांचा जन्म १५ सप्टेंबर १८६१ सालीं कोलार जिल्ह्यांतल्या मुद्देनहल्ली गांवीं झाला होता. शालेय जीवनापासून त्यांना नियमितपणें परिश्राम करण्याची संवय होती. ते पंधरा वर्षांचे असतांना त्यांचे वडिल वारले. पण त्यांच्या मातोश्रीनें धीर धरून आपल्या मुलाला उच्च शिक्षण घेण्यास प्रवृत्त केलें. १८७५ सालीं बंगलोरला महाविद्यालयांत दाखल होऊन १८८१ सालीं ते बी. ए. झाले. म्हैसूरचे त्याकाळचे दिवाण श्री. रंगाचारलु ह्यानीं ह्या विद्यार्थ्याची पात्रता ओळखून त्याला शिष्यवृत्ति देऊन पुण्यास पाठविलें. १८८३ सालीं ते इंजिनिअरिंगची परिक्षा प्रथम श्रेणींत पास झाले, एवढेंच नव्हे तर सर्व मुंबई इलाख्यांत ते पहिले आले. त्यानंतर मुंबई सरकारच्या पब्लिक वर्क्स् खात्यांत असिस्टंट इंजिनिअर म्हणून ते नोकरी करूं लागले, व ह्या ठिकाणीं पुढें उच्च स्थान प्राप्त झालें नाहीं म्हणून १९०८ सालीं ते निवृत्त झाले. ह्या चोवीस वर्षांच्या कारकिर्दींत त्यानीं केलेल्या अनेक सुधारणांत पाटबंधाऱ्यांची विशिष्ट पद्धति उल्लेखनीय म्हणतां येईल. सॅनिटरी व पाटबंधारे ह्या इंजिनिरिंगच्या विभागांत ते एक अनुभवी तज्ञ होते. सिंधमध्यें सक्कर येथें त्यांना ह्याच कामासाठीं मुद्दाम निमंत्रण दिलेलें होतें. स्कॉटमानक्रिफ कमिशननें त्याच्या ह्या कर्तृत्वाचा विशेष गौरव केल्यामुळें त्यांना एकदम प्रसिद्धि मिळाली. ह्याशिवाय धरणाचे खास उघडझाप करणारे दरवाजेहि त्यांनीच शोधून काढले. मुंबई राज्यातून सेवानिवृत झाल्यावर ते परदेशात गेले व तिथून परतल्यावर हैद्राबाद राज्याचे पूरसंक्षण सल्लागार म्हणून त्यांनीं काम केलें. त्यानंतर म्हैसूर राज्याचे मुख्य इंजिनिअर म्हणून त्याची नेमणूक झाली. तेथील पाटबंधाऱ्याची योजना, कृष्णराजसागरची योजना व रेल्वे मार्गाची योजना हें विश्वेश्वरैय्यांच्या कर्तबगारीचेंच फळ आहे. १९१२ सालीं ते म्हैसूरचे दिवाण म्हणून नियुक्त झाले. म्हैसूर राज्याची सुसज्ज रचना, आर्थिक प्रगति व सर्वांगीण सुधारणा विश्वेश्वरैय्यांच्या कार्यक्षम दूरदृष्टि व कर्तृत्वशक्तीचें प्रसादचिन्ह आहे. म्हैसूर सरकारनें त्याच्या ह्या थोर नागरिकाची अंत्यव्यवस्था विशेष इतमामानें करून आपली कृतज्ञता व्यक्त केली हें





अनुक्रमणिका

उचितच झालें. त्यांची पत्नी कांहीं वर्षांपूर्वी वारल्यानंतर ते एकांतवासांत विधुरावस्थेंत काळ कंठित असत. त्यांच्या कर्तृत्वाच्या ख्यातीमुळें परदेशांतूनहि त्यांना सल्ल्यासाठीं आमंत्रणें येत असत. भारतमंत्री लॉर्ड मोर्ले ह्यांनीं एडनच्या ड्रेनेज योजनेसाठीं त्यांना खास पाचारण केलें होतें. औद्योगिक उत्कर्षाचा संदेश त्यांनीं भारताला देऊन ते स्वस्थ बसले नाहींत तर भारताच्या नियोजनावर त्यांनीं दोन ग्रंथ लिहून मार्गदर्शनहि केलें. उद्योगधंद्याच्या प्रगतीसाठीं प्रचंड धरणयोजना व विद्युत्‌निर्मितिच्या त्यांच्या सूचना स्वातंत्र्यप्राप्तीनंतर अमलांत आणून त्यांच्या हयातींतच बहुतेक पूर्ण केल्या गेल्या, ह्याबाबत त्यांनीं दिलेला बहुमोल सल्ला भारताच्या औद्योगिक प्रगतीला अतिशय उपकारक ठरला. त्यांच्या ज्ञानाचा गौरव भारत सरकारनें करून १९५५ सालीं त्यांना 'भारतरत्न' ही सर्वोच्च पदवी दिली गेली. भारताच्या ह्या आंतरराष्ट्रीय कीर्तीच्या थोर सुपुत्राला जरी दीर्घायुष्य लाभलें तरि त्यांचे निधन झाल्यामुळें एका ज्येष्ठ अनुभवी सल्लागाराच्या बहुमोल मार्गदर्शनाला राष्ट्र मुकल्यामुळें बरीच हानि झाली आहे. ह्या शतायुषी विश्वकर्म्याच्या स्मृतीला आम्हीं नम्र अभिवादन करतों.

### गोमंतकीय मराठी शिक्षण सम्मेलन

गेल्या महिन्यांत मडगांव येथें गोमंतकीय मराठी शिक्षण संमेलनाचें चौथें अधिवेशन भरलें होतें. गोमंतकीय मराठी शिक्षणाचा दर्जा प्रतिकूल परिस्थितींत कसा सुधारतां येईल. ह्यासाठीं १९३३ सालीं मठग्रामस्थ हिंदु सभेच्या विद्यमानें मडगांव येथें प्रा. रामचंद्र नायक ह्यांच्या अध्यक्षतेखालीं भरलें होतें. दुसरें अधिवेशन १९३६ सालीं सुप्रसिद्ध गोमंतकीय पत्रकार व साहित्यिक कै. द. व्यं. पै यांच्या अध्यक्षतेखालीं भरलें होतें. तिसरें अधिवेशन १९३७ सालीं प्रा. बा. वा. सावर्डेकर ह्यांच्या अध्यक्षतेखालीं मडगांव- येथेंच भरलें होतें. त्यानंतर आज पंचवीस वर्षांनें मुक्त गोमंतकांतल्या खुल्या वातावरणांत हें चौथें अधिवेशन भरण्यांत आलें होतें. वास्तविक हें अधिवेशन १९३८ सालींच भरावयाचें पण तें न भरूं शकल्यामुळें दोन तपांनीं हा योग आला. प्रस्तुत सम्मेलनाचे अध्यक्ष म्हणून मुंबईचे सुप्रसिद्ध कायदेपंडित श्री. सुशील कवळेकर हे होते व स्वागताध्यक्ष तपोवृद्ध श्री. केशवराव नायक हे होते. सुप्रसिद्ध शिक्षणतज्ज्ञ व पुणे विद्यापीठाचे माजी कुलपति रँग्लर परांजपे हे सम्मेलनाचे उद्घाटक होते. उद्घाटनाच्या भाषणांत रँग्लरसाहेबांनीं मराठी–कोकणी वाद गाडून टाकण्याची आवश्यकता स्पष्ट करून मराठी भाषेचा गोव्याशीं पूर्वापार संबंध कसा आहे हें सोदाहरण सिद्ध केलें. तसेंच कर्नाटकाचा गोव्याशीं सुतराम संबंध नाहीं हेंहि त्यांनीं ठणकावून सांगितलें.

ॲ. कवळेकर यांनींहि आपल्या अध्यक्षीय भाषणांत कोकणी–मराठी वादाचा विस्तारानें परामर्श घेऊन भाषाकारणाचा उपयोग राजकारणाकडे केल्यामुळें निर्माण झालेल्या आपत्तींचे यथार्थ दिग्दर्शन केलें. अनेक भाषाशास्त्रज्ञांचे आधार घेऊन कोकणी ही स्वतंत्र भाषा नसून मराठीचीच ती बोली आहे हें त्यांनीं स्पष्टपणें सांगितलें व कोकणीवाद्यांच्या प्रचलित कारवाया कशा घातुक व स्वार्थपरायण आहेत हेंहि त्यांनीं ठाशीव वक्तृत्वानें पटवून दिलें. मराठीला स्थानच्यूत करून त्या ठिकाणीं कोकणीची प्राणप्रतिष्ठा केली तर गोमंतक स्वतंत्र अथवा निदान केंद्रशासित राहील ही कल्पना कशी भ्रामक आहे हे त्यांनीं राजकीय व आर्थिक तत्त्वांच्या निकषानें स्पष्ट केलें. एवढेंच नव्हे तर पुढें जाऊन 'हिंदु व ख्रिस्ती समाजांत भिंत उभी करण्यासाठीं अथवा आपले राजकीय डावपेंच खेळण्यासाठीं जे लोक कोकणी–मराठी वादाचे कोलित पेटवतात ते गोमंतकाचे शत्रू होत हे निःसंशय' असें निःसंदिग्ध शब्दांत सांगून आपल्या तीव्र भावना स्पष्ट केल्या. सरकारमान्यतेसाठीं कोकणी व मराठी ह्या भाषांत आगामी संधिकालांत स्पर्धा सुरू होणार आहे. गोव्यांतील शिक्षणाचे माध्यम काय असावें ह्यासाठीं दोन शिक्षणतज्ज्ञांची समिति सरकारनें नेमली आहे. गोव्यांतील मराठी जनतेनें वेळींच जागरूक राहून ह्या विषम व निरर्थक स्पर्धेला तोंड दिलें पाहिजे.

गोमंतकीय जनतेनें मराठीसाठींच हट्ट धरून मराठी शाळांची मागणी केली पाहिजे व मराठी शाळांतच आपली मुलें पाठविण्याचा निश्चय केला पाहिजे तर हे डावपेंच जनतेच्या बहिष्कारापुढें असफल होतील. दुय्यम शिक्षणांतहि मराठीचें स्थान टिकवून ठेवल्यानें कोकणीवाद्यांना आपोआपच चपराक मिळून शिक्षणक्षेत्रांतून तरी या बारभाईचें आपोआप उच्चाटन होईल. गोमंतक मराठी असून तो महाराष्ट्रांत विलीन झाला पाहिजे ह्यासाठीं चळवळ सुरू झाली तर शैक्षणिक क्षेत्रांतल्या ह्या मराठीच्या अत्याग्रहाचा तिला आपोआप सबळ पाठिंबा मिळूं शकेल. प्रस्तुत परिषदेनें ह्या दृष्टीनें केलेले ठराव निःसंशय स्वागतार्ह आहेत, व ते आगामी शिक्षणवर्ष सुरू होण्याच्या दीड महिन्याच्या अवधींत परिश्रमानें व अडीअडचणींना तोंड देऊन कार्यवाहींत आणण्याची पराकाष्ठा कार्यकर्त्यांनीं केली पाहिजे तरच प्रस्तुत गोमंतकीय शिक्षण सम्मेलनाची यथार्थ फलश्रुति होईल. गोमंतकीय जनतेनें परकीय अंमलाखालींदेखील त्यागानें व हिरिरीनें मराठीची जोपासना केली होती. तेव्हां मराठीच्या भवितव्याच्या किंबहुना सांस्कृतिक एकात्मकतेच्या या संग्रामकालांत निधडे गोमंतकीय कार्यकर्ते तसेंच संघटन करून झुंज देतील याबद्दल संदेह वाटण्याचें मुळींच कारण नाहीं.

### श्री. यशवंतराव सुखठणकर

मुंबईचे एक सुप्रसिद्ध समाजसेवक व सारस्वतज्ञातींतील थोर कर्मयोगी श्री. यशवंत हणमंत सुखठणकर ह्यांना फेब्रुवारीच्या २४ तारखेस एकाहत्तरावें वर्ष लागलें व त्या निमित्तानें सारस्वत बांधवांनी त्यांचा सत्कार मोठ्या थाटानें केला हे उचितच झालें. अंगांत लांब डगला, डोक्यावर काळी टोपी व हातांत एक कापडाची पिशवी, साधें धोतर आणि चपला वापरणारी ही उंचनिंच मूर्ति ज्यांनीं पाहिली असेल त्यांना त्यांच्या निकोप प्रकृतीवरून, जलद चालीवरून व कामसू वृत्तीवरून यशवंतरावांनीं सत्तरी ओलांडली हें सांगूनसुद्धां खरें वाटणार नाहीं. नियमित जीवनांत फक्त समाजकार्याचें व्यसन असणाऱ्या ह्या व्यक्तीबद्दल पुष्कळांनीं ऐकलें असेल, पण विनम्र स्वभाव, मितभाषी वृत्ति आणि प्रसिद्धिविन्मुखता ह्यामुळें गेलीं तीनचार तपें सारस्वतबांधवांची अहर्निश सेवा करणारी ही तपोवृद्ध व्यक्ति सामान्य माणसाच्या विशेष परिचयाची असणें संभवत नाहीं. सारस्वत विद्यार्थी सहाय्यक मंडळीचे ते एकमेव आधारस्तंभ आहेत हे त्यांच्या तत्संबंधींच्या कार्यावरून सहजच

अनुक्रमणिका









लोकशाही समाजवाद हे आपल्या देशाचे ध्येय होय. द्वितीय वर्धापन दिनाच्या दिवशीं महाराष्ट्राला आपल्या प्रतिज्ञेचा पुनरुच्चार करून सांगावयाचे आहे कीं, शेती आणि औद्योगिक क्षेत्रांत शांततामय क्रांति घडवून आणून हे ध्येय साध्य करण्यांत येईल. ह्या वर्धापन दिनीं राज्यांत सुरू होणारी सत्ता विकेंद्रीकरणाची योजना म्हणजे ह्या ध्येयाप्रत जाण्याची एक पायरीच होय.

१ मे १९६२ महाराष्ट्र राज्याचा
द्वितीय वर्धापन दिन

संचालक प्रसिद्धी विभाग-महाराष्ट्र सरकार मुंबई.





अनुक्रमणिका

ज्ञात होईल. संस्था स्थापनेच्या वेळीं जमलेल्या दहा रुपयांच्या निधीवरून तो आजच्या सुमारें सात-आठ लक्षांच्या शिलकीपर्यंतची 'मडळी'ची वाटचाल ही यशवंतरावांच्या प्रदीर्घ सततोद्योगाचे एक प्रसादफल आहे. सारस्वत बांधवांत गरीब कोण श्रीमंत कोण हें ओळखून त्यांनीं पिशवींत पावतीपुस्तक बाळगून मुंबईभर पायपिटी केली व आपल्या विनम्र वाणीनें कार्याचें महत्व पटवून निधी जमविला. कांहींनीं त्यांना फुलें दिली, कांहींनीं पापळ्या दिल्या तर कांहींनीं त्यांच्या मार्गांत कांटेहि पसरले पण ह्या सर्व सन्मानांत सस्मित चेहऱ्यानें ते वावरले, अपमान गिळून कार्याकडे लक्ष संपूर्णपणें लावलें आणि विरोधकांनांहि हंसत अभिवादन करून ते मार्गस्थ झाले. यशवंतरावांनीं सुखासीन व्हायचें मनांत आणलें असतें तर तें अशक्य नव्हतें, पण सेवाव्रताच्या पालनासाठीं वयोमानाप्रमाणें आवश्यक तेवढी विश्रांतीहि त्यांनीं कधीं घेतली नाहीं. काल संस्था स्थापन झाल्यावर आज हातांत चामड्याची, डॉक्युमेन्ट केस' घेऊन मिरवणारे, संस्थेच्या खर्चानें चहापाणी चाखणारे व टॅक्सींत हिंडणारे सन्मान्य प्रमुख चिटणीस कितीतरी आढळतात. पण आपल्या पादत्राणावर विसंबून राहणारे, वेळीप्रसंगीं संस्थेसाठीं स्वतःच पदरमोड करणारे आणि सत्तावन्न वर्षें साधीच पिशवी आणि सोज्वळ वेष धारण करणारे अद्वितीय सच्चे समाजसेवक म्हणजे यशवंतराव सुखठणकरच. त्यांचें निष्ठापूर्ण कार्य, निरपेक्ष समाजसेवा व स्वार्थत्यागी स्वभाव ह्याचा अनुभव अनेकांना आल्यामुळेंच त्यांचा हा उत्स्फूर्त सत्कार होऊं शकला. ज्या विद्यार्थ्यांना गरिबीमुळें शिक्षण घेतां आलें नाहीं त्यांच्यासाठीं यशवंतरावांनीं सर्वतोपरी प्रयत्न करून त्यांचें जीवन प्रकाशमान केलें. ह्यापैकीं अनेक हुषार विद्यार्थी पुढें परदेशांतूनहि शिकून आले व मोठ्या अधिकाराच्या जागांवर स्थानापन्न झाले. ह्यांतलें कांहीं संस्थेशीं आणि यशवंतरावांशीं कृतज्ञ राहिले, तर कांहींनीं त्यांना साधी ओळखहि दाखविण्याचें सौजन्य ठेवलें नाहीं. यशवंतराव अपमानानें जसे खचलेले नाहींत तसे गौरवानें ते कधीं फुगलेले नाहींत. स्थितप्रज्ञाची त्यांची वृत्ति गेली कित्येक व
पासून अबाधित आहे आणि हेंच त्यां
खऱ्या थोरपणाचें लक्षण आहे. यशवंतरावां
उद्योगी वृत्तीमुळेंच त्यांचे आरोग्य अ
निकोप आहे. कामाच्या घांदलींत प्रकृती
त्यांनीं लक्ष दिलें नाहीं. त्यांच्या दारावर
पाटीवरच्या यशवंतरावांच्या घरांतल्या त्यां
अनुपस्थितीची जाणीव करून देणा
'आउट' ह्या शब्दानें रोगालाहि त्यांची
घेण्याची कधी संधी मिळाली नाहीं. कुणाचे
काम करण्यासाठीं त्यांनीं कधीं नकार द
विला नाहीं, एवढेंच काय, पण तें स
झाल्यावर केवळ तेवढीच बातमी सांगण्यापु
ते क्षणभर थांबतील आणि पुन्हां पुढें च
लागतील. ह्या थोर समाज सेवकाला आ
नम्रपणें प्रणाम करतो व त्यांना दीर्घायुरा
प्राप्त होऊन त्यांच्या हातून अशीच समा
सेवा घडो असें चिंतितों.

—सारस्व

---

(पान १८ वरून)

अपयशाचें सारें खापर लॉर्ड ऑक्लण्डवर फुटलें, पण निंदास्तुतीची पर्वा न करतां निमूटपणें कर्तव्य करीत राहाणारा तो कर्मयोगी होता. मनाचा तोल ढळूं न देतां तो आपली नियुक्त सेवा करीत राहिला. भारतांत शिक्षणाचा प्रसार व्हावा, प्रजेची स्थिति सुधारावी, गोऱ्या लोकांकडून काळ्यांना जुलूम सहन करावा लागूं नये, म्हणून त्यानें अनेक प्रयत्न केले, पण हिंदुस्थानांतल्या गोऱ्या लोकांनीं ते हाणून पाडले.

स्वदेशीं परत जाण्याचे दिवस शेवटीं एकदाचे आले. नको असलेल्या कलकत्त्याबद्दल देखील सहा वर्षांत एमिली व फॅनी यांना जिव्हाळा वाटूं लागला होता, त्यामुळें हिंदुस्थानचा किनारा सोडताना सर्वांना थोडें वाईट वाटलें, पण स्वदेशी जाण्याच्या आनंदांत बाकी साऱ्या गोष्टींचा विसर पडला. पुन्हां चार महिन्यांचा समुद्रप्रवास, आणि परत इंग्लंड ! मायदेशांत पूर्वीचे लागेबांधे लगेच सुरू झाले. जॉर्जवर विशेष ठपका आला नाहीं. त्याच्या जागीं पाठवण्यांत आलेल्या लॉर्ड एलनबरोनें जोरदार धोरण ठेवून अफगाणांना धडा शिकवण्याकरतां दुसरें युद्ध करून तें जिंकलें. इंग्लंडमध्यें लॉर्ड जॉन रसेलच्या मंत्रिमंडळांत लॉर्ड ऑकलंड पुन्हां प्रमुख आरमारमंत्री झाला. एमिलीच्या हकीकतींचें प्रकाशन करण्याची खटपट सुरू झाली. चित्रसंग्रह प्रसिद्ध झाला. विल्यमचेंहीं एक पुस्तक प्रसिद्ध झालें. १८४९ मध्यें जॉर्ज ईडन, अर्ल आक्लंड चौसष्टाव्या वर्षीं निधन पाव
लौकरच फॅनी क्षीण होऊन अठ्ठेचाळिसाव्या वर्षीं धावत्या छायेसार
नाहिशी झाली. एमिली तेव्हां बावन वर्षांची होती. आप्त मित्रपरिव
भाचेभाच्या, राजकारणचर्चा, लेखन, चित्रकला अशा गोष्टींत
विरंगुळा मानूं लागली. तिनें दोन कादंबऱ्या लिहून प्रसिद्ध के
त्यांचें स्वागत झालें. भावंडे हळूहळूं गळून कमी होत होतीं. अ
फक्त धाकटा भाऊ रॉबर्ट उरला होता, तो एव्हाना बिशप झ
होता. दहा भावंडांच्या जुन्या आठवणी चाळित एमिली समाधा
वाट पाहात होती. मृत्यु तिला १८६९ मध्यें घेऊन गेला. ति
सगळयात जास्त आठवण करणारा एक तिचा भाचा वि
ऑस्बर्न उरला. हिंदुस्थानात तो सारखा तिच्या आसपास अ
'अपद्‌कण्ट्री' (उत्तरेकडे दौरा या अर्थी) या पुस्तकरूपानें ति
हिंदुस्थानातल्या प्रवासाची हकीकत प्रसिद्ध झाली तेव्हां अर्पण पत्रि
तिनें विल्यमला उद्देशून लिहिलें आहेः 'तीस वर्षांपूर्वीच्या
प्रवासी टोळींतले आपण दोघेच उरलो. आतां रेलवेची पीडा हिंदु
नवर आल्यानंतर इकडच्याप्रमाणेंच तिकडेही जीवित-वित्ताला शा
राहणार नाहीं. बहुधा कुतुबमिनारचें रेलवेस्टेशन करतील, ताजमहा
होटेल करणारी आग्रा कंपनी निघेल आणि आपली बॅग घे
निघालेल्या पहिल्या वर्गाच्या उतारूसारखी गव्हर्नरजनरलची स्थि
होईल. ...' ● ●

---

हें मासिक, संपादक व मुद्रक श्री. दीनानाथ दलाल यांनीं आवाज प्रिंटर्स, मोदी चेंबर्स, फ्रेंच ब्रीज, मुंबई ४ येथें छापून
दलाल आर्ट स्टुडिओ, ४०।४२ कॅनेडी ब्रीज, मुंबई ४ येथें प्रकाशित केलें.



# रेल्वेज् देशाचे औद्योगिकरण वाढवित आहे

देशभर कोळ्याच्या चकाकणाऱ्या
जाळ्याप्रमाणें पसरलेल्या, उभे आडवे छेदून
जाणाऱ्या, लोहमार्गाच्या जाळ्यावरून मध्य आणि
पश्चिम रेल्वेज् वाजवी प्रमाणावर औद्योगिक
सामानाची जलद आणि थोडक्या पैशांत वाहतुक करतात.
देशाच्या भरभराटीसाठीं कच्चा माल,
मानवी-शक्ति आणि तयार माल यांच्या साहाय्यानें
रेल्वेज् न थांबता—रात्रंदिवस—पुढें वाटचाल करीत आहे.
केवळ मुंबईच्या उपनगरांतील रेल्वेज्
दररोज जवळजवळ तेरा लाख लोकांची वाहतुक करतात.

राज्याच्या आर्थिक उत्कर्षासाठीं,
महाराष्ट्राच्या कानाकोपरांतून पसरलेल्या जवळजवळ
३,८०० किलोमिटर्सचा लोहमार्ग असलेल्या, रेल्वेज् मोठ्या अभिमानानें
आपले महत्त्वाचे कार्य पार पाडीत आहेत.

## मध्य आणि पश्चिम रेल्वेज्

CWR. 1180 MAR












अनुक्रमणिका

# नव्या युगाची प्रभात

: लेखक :
डॉ. गोपाळराव खेडकर
ग्रामीण विकास मंत्रि, महाराष्ट्र राज्य

१ मे पासून अंमलांत येणाऱ्या १९६२ च्या महाराष्ट्र जिल्हा परिषदा व पंचायत समित्या विषयक अधिनियमामुळें महाराष्ट्राच्या सामाजिक व आर्थिक इतिहासांत एका नव्या कालखंडास प्रारंभ होत असून राज्यांत राज्यकारभाराचें लोकशाही विकेंद्रीकरण घडून येत आहे. आतां शासनाच्या विकास विषयक व राज्यकारभारविषयक कामाची जबाबदारी या स्थानिक संस्थावर टाकण्यांत आली असून या संस्थांना हीं कामें राज्यावर तद्विषयक असलेल्या सांविधानिक जबाबदारीच्या आधीन राहून पार पाडायचीं आहेत.

## जिल्हा परिषदांचे कार्यकारी अधिकार

महाराष्ट्रांतील जिल्हा परिषद ही जिल्हा पातळीवर अंमलबजावणी करणारी अशी एक बलवान संस्था आहे. आंध्र प्रदेश वगळून इतर सर्व राज्यांत जिल्हा परिषद ही केवळ सल्ला देणारी व कोणताही कार्यकारी अधिकार नसलेली अशी संस्था आहे. आंध्र प्रदेशांत जिल्हा परिषदेला हायस्कूल्स, जिल्ह्यांतील मोठे रस्ते इत्यादींसारख्या उल्लेखनीय कामांच्या बाबतींत कार्यकारी अधिकार आहे. विकेंद्रीकरण कायद्यांत पंचायत समित्यांना जिल्हा परिषदांचे कार्यकारी अंग म्हणून बनविण्यांत आले आहे.

जिल्हा परिषदेला पंचायत समित्यांच्या मार्फत कांहीं निर्दिष्ट केलेल्या योजना कार्यान्वित कराव्या लागतात आणि परिषदेला वाटल्यास आणि तसें करणें शक्य असल्यास ती पंचायत समित्यांच्या मार्फत इतरही योजना कार्यान्वित करूं शकते. पंचायत समिती व ग्रामपंचायत या दोहोंच्या बाबतींत देखील अशाच प्रकारची व्यवस्था आहे. गटाच्या पातळीवर असलेल्या विशिष्ट कामकाजांच्या बाबतींत देखील पंचायत समितीवर प्राथमिक जबाबदारी सोपविण्यांत आली आहे. गट पातळीवरील पंचायत समितीला, जिल्हा परिषदेनें निर्धारित केलेल्या रकमेच्या आंत अनुदानें मंजूर करण्याचा अधिकार आहे.

## पंचायत समिती

पंचायत समिती ही एक स्वतः कार्य करणारी लहानशी संस्था असल्यामुळें तिची एकही उपसमिती राहणार नाही. उलटपक्षीं, जिल्हा परिषदेची एक स्थायी समिती वित्त, बांधकाम, शेती, सहकारी संस्था, शिक्षण व आरोग्य यांच्याशीं संबंधित असलेल्या प्रत्येक विषयासाठीं एकेक विषय समिती राहील. जिल्हा परिषदेचा अध्यक्ष हा स्थायी समितीचा सभापति राहील आणि विषय समित्यांचे सभापती आणि सात निवडून आलेले परिषद सदस्य या स्थायी समितीचे सभासद राहतील. त्याशिवाय स्थायी समितीला निर्धारित केलेल्या विषयांचे खास ज्ञान वा अनुभव असलेल्या दोन व्यक्तींना स्थायी समितीचे सहकारी सभासद म्हणून स्वीकृत करण्याचा जिल्हा परिषदेला अधिकार राहील.

विषय समित्यांच्या बाबतींत सांगावयाचें म्हणजे, जिल्हा परिषदेचा उपाध्यक्ष हा त्यांतील दोन समित्यांचा सभापति राहील. जिल्हा परिषदेकडून आणखी दोन सभापतींची निवड करण्यांत येईल आणि ते उरलेल्या विषय-समित्यांचे सभापति राहतील. सहकारी समिती सोडून प्रत्येक विषयक समितीमध्यें जिल्हा परिषदेनें निवडून दिलेले सात सभासद व खास ज्ञान अथवा अनुभव असलेल्या व्यक्तींमधून जिल्हा परिषदेनें स्वीकृत केलेल्या दोन व्यक्ती राहतील. हे स्वीकृत केलेले सभासद समितीचे सहकारी सभासद म्हणून रहातील.

सहकार समितीमध्यें जिल्हा परिषदेनें निवडून दिलेले पांच सभासद आणि पांच सहकारी सभासद राहतील हे सहकारी सभासद जिल्हा पातळीवरील सहकारी संस्थांच्या संघांचे सभापति असतील.

जिल्हा परिषदेच्या निरनिराळ्या समित्यांना मंजुरी कारभारविषयक नियंत्रण आणि ठराविक मर्यादेंत अंदाजपत्रकांतील पुनर्विनियोजन या बाबतींत विशिष्ट अधिकार देण्यात आलेले आहेत. या समित्यांच्या खालोखाल पदाधिकाऱ्यांना म्हणजे जिल्हा परिषदेच्या अध्यक्षांना व विषय समितींच्या सभापतींना थोड्या कमी मर्यादेंत मंजुरीचे अधिकार रहातील. जिल्हा परिषदेचे पदाधिकारी निवडून आलेल्या सभासदांमधूनच निवडायचे आहेत, ही गोष्ट येथे लक्षांत घेतली पाहिजे.

## सुनिश्चित साधनें

अशा रीतीनें त्या त्या जिल्ह्यामध्यें विकास कार्याची अंमलबजावणी करण्याच्या दृष्टीनें जिल्हा परिषद, पंचायत समिति, जिल्हा परिषदेची स्थायी समिति व विषय समित्या, पदाधिकारी व अधिकारी यांचे स्वरूप सुनिश्चित करण्याची, योजना आहे. यांत कामाची परस्पर व्यापकता नाहींशी करण्यांत आली असून प्रभावी कार्य कसें होईल हें या सर्व व्यवस्थेचें ध्येय आहे.

सत्ता विकेंद्रीकरणाच्या योजनेंत जिल्हा परिषद व ग्रामपंचायत यांच्यासाठीं प्रस्थापित करण्यांत आलेल्या कर्मचारी वर्गाचें स्वरूप देखील या ठिकाणीं लक्षांत घेण्यासारखे आहे. इतर राज्यांमध्यें अशा परिवर्तनचा विचार देखील करण्यांत आला नव्हता आणि भावी स्थानिक संस्थांच्या गरजांचा आणि कार्यपद्धतीचा अभ्यास करण्याच्या दृष्टीनें जिल्ह्यामधील प्रशासकीय यंत्रणेची पुनर्घटना करण्याचा प्रयत्न झाला नव्हता. गांवाच्या पातळीवरील महसूल वसुलीचे कार्य ग्रामपंचायतींना देण्यांत आलें आहे. ही गोष्ट अन्य राज्यांत घडून आलेली नाहीं.

जिल्हा परिषदांना पुरेशा पैशाची तरतूद करण्याची काळजी घेण्यात आली आहे. वसूल करण्यांत आलेल्या जमीन महसुलाचा ७० टक्के भाग जिल्हा परिषदांना मिळणार असून उरलेले ३० टक्के ग्रामपंचायतींना मिळतील. त्याशिवाय परिषदांना, स्थापना अनुदानें विशिष्ट कामाचीं अनुदानें, विकास गट अनुदानें यासारखीं अनुदानें देखील मिळण्याची तरतूद आहे.



अनुक्रमणिका

अनुक्रमणिका

